# व्यक्ति आणि वाङ्मय

( टीकात्मक आणि भाषाशास्त्रविषयक
निबंध आणि प्रबंध )


लेखक

श्रीकृष्ण केशव क्षीरसागर, बी. ए.






१९३७

किंमत १। रुपया.

तेजस्विनावधीतमस्तु ।

# समर्पण

विद्वद्रत्न ज्ञानकोशकार

श्रीधर व्यंकटेश केतकर

एम्. ए., पीएच्. डी.

यांच्या पूज्य आणि स्फूर्तिदायक

स्मृतीस वंदनपूर्वक

समर्पण

ग्रंथकर्ता.

# प्रस्तावना

श्री. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर यांच्या या लेखसंग्रहाला प्रस्तावना लिहितांना मला विशेष प्रकारचा आनंद होत आहे. कारण इतक्या व्यासंगपूर्वक आणि चिकित्सक बुद्धीनें लिहिलेल्या लेखांचा संग्रह वाचण्याचा योग अलिकडे सहसा येत नाहीं. वीस वर्षांपूर्वी मी ज्या वेळीं साहित्यक्षेत्रांत पदार्पण केलें, त्यावेळीं टीकालेखन हेच स्वतःच्या बुद्धीची चमक दाखवून नांव कमावण्याचें विद्वत्संमत साधन समजलें जात असे; व कै. श्री. कृ. कोल्हटकर यांच्याशीं झालेल्या पहिल्याच भेटींत, तेव्हां 'नवयुग' मासिकांतून नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या आधुनिक कविपंचकापैकीं गोविंदाग्रजांवरील लेखासंबंधीं निरनिराळे प्रश्न विचारून, त्यांनीं माझ्या साहित्यशास्त्रविषयक ज्ञानाची जी चांचणी घेतली, तिची मला अजून चांगली आठवण आहे. ती स्थिति आतां उरलेली नाहीं. आज मराठी वाङ्मयांत कथायुग सुरू आहे. या युगाचा महिमा असा आहे कीं, टीचभर चटकदार लघुकथा लिहावी आणि तिच्यामुळें चारचौघांच्या तोंडीं झालेलें आपलें नांव ऐकून अस्मान ठेंगणें वाटावें. आणि कथालेखकाचें अस्मान खरोखरीच ठेंगणे असतें. त्याला विद्वत्ता लागत नाहीं, भाषाप्रभुत्वाची वाण पडत नाहीं आणि दीर्घकाळ परिश्रम करण्याच्या सामर्थ्याचीहि गरज भासत नाहीं. निरीक्षित दृश्यांचें मनोरंजक वर्णन करण्यापुरती लेखनकामाठी अवगत असली म्हणजे त्याचें काम भागतें. उलट कुशाग्रबुद्धि, बहुविध व्यासंग, मार्मिक दृष्टि आणि अविरत श्रमशीलता हे गुण अंगीं असल्याविना टीकालेखनांत यश संपादन करणें शक्य नाहीं. म्हणूनच प्रस्तावकाची भूमिका मला फारशी प्रिय नसतांनासुद्धां, प्रस्तुत ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्याची श्री. क्षीरसागर यांची विनंति मी आनंदानें मान्य केली.

टीकालेखनाची जी ही हेळसांड अलिकडे महाराष्ट्रांत होत आहे, तिचें मुख्य कारण, त्या लेखनप्रकाराचा समावेश ललित वाङ्मयांत होत नाहीं, ही त्याच्याविषयींची समजूत होय. मराठींत गेलीं पाऊणशें वर्षें ज्या पद्धतीनें

श्री. क्षीरसागर यांच्या प्रस्तुत लेखसंग्रहांतील टीकालेखांत मला हा गुण प्रकर्षानें दिसून आला. लोकहितवादी, श्री. न. चिं. केळकर व त्याहि॰ पेक्षां श्री. माधव ज्यूलियन यांच्यावरील त्यांचे लेख या दृष्टीनें विशेष उल्लेखनीय आहेत. ग्रंथावरून ग्रंथकाराच्या अंतरंगांत शिरण्याची आणि तें विशद करण्याची त्यांची चातुरी तांबे, गडकरी, अत्रे आणि यशवंत यांच्या॰ वरील लेखांत प्रत्ययाला येते. मराठींत अशा प्रकारचे व्यक्तित्वविवेचक टीकालेख आधुनिक लेखकांवर लिहिलेले तरी सहसा आढळांत येत नाहींत. याचें कारण उघडच आहे. आपल्या डोळ्यांपुढें ज्याचें चरित्र घडलें किंवा घडत आहे, त्या समकालीन लेखकाच्या व्यक्तित्वाशीं समरस होण्याइतकी सहृदयता आणि गुणग्रहणबुद्धि टीकाकारांत बहुधा दृष्टीस पडत नाहीं; व म्हणूनच गतकालीनांविषयीं लिहितांना अतिरिक्त आदरानें पछाडले जाणारे लेखक समकालीनांविषयीं लिहितांना दोषैकदृष्टि बनतात. कै. बा. अ. भिडे यांनीं तुकारामावर लिहिलेला छोटेखानी प्रबंध हा कलात्मक टीकेचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून मानला जाईल. पण, त्या प्रबंधांत तुकारामाच्या वांट्याला जी त्यांची सहृदयता आली आहे, तिचा एक शतांशहि त्यांच्या चिकित्सक बुद्धीचे परीक्ष्य होण्याचा प्रसंग ज्या अर्वाचीन कवींवर आला त्यांना लाभूं शकला नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. कलात्मक म्हणजे विधायक टीकालेखनाची पद्धत महाराष्ट्रांत मुळींच नव्हती, असें नाहीं. राजवाड्यांचा रामदास, तेलंगांची कृष्णगीता आणि खिस्तगीता किंवा कोल्हटकरांची रागिणी आणि तिर्चा भावंडें असे कांहीं लेख जुन्या पिढीं- तील टीकाकारांच्या निर्माणक टीकापद्धतीची साक्ष देतात. पण अशा तऱ्हेचे टीकालेख एकंदरींत थोडेच सांपडतील; व म्हणूनच श्री. क्षीरसागर यांच्या प्रस्तुत ग्रंथांतील अर्वाचिन साहित्यिकांवरील विवेचक लेखांचें महत्त्व मला जास्त वाटतें. त्यांच्या या लेखांत सहृदयता आणि मार्मिकता यांचा उत्तम मेळ पडला असून, गुणगौरव करण्याच्या ऐन भरांत सुद्धां ते दोषां- कडे मोठ्या सफाईनें अंगुलिनिर्देश करितात.

भाषाशुद्धीवरील त्यांचे लेख हे त्यांच्या तर्कशुद्ध विचारसरणीचे आणि ओजस्वी लेखनशैलीचे निदर्शक आहेत. भाषाशुद्धीच्या चळवळीचा पूर्वपक्ष

जितक्या अट्टाहासानें लोकांपुढें वारंवार मांडला गेला आहे, तितका तिचा उत्तरपक्ष मात्र लोकांपुढें मांडण्यांत आलेला नव्हता. ती उणीव श्री. क्षीरसागर यांच्या प्रस्तुत संग्रहांतील लेखांनीं उत्कृष्ट रीतीनें भरून निघाली आहे. पारतंत्र्यांत आणि परचक्राच्या दहशतींत अनेक शतकें काढावीं लागल्यामुळें हिंदु समाज ज्या न्यूनगंडाच्या राष्ट्रीय भावनेनें ग्रस्त झाला आहे, त्याचाच भाषाशुद्धीची चळवळ हा एक आविर्भाव आहे, असें मला वाटतें. परकीयांना स्वधर्मांत येऊं द्यावयाचें नाहीं, किंबहुना त्यांचा स्पर्शसुद्धां गर्ह्य मानावयाचा, अशी हिंदूंची वृत्ति गेलीं शेंकडों वर्षें आहे. परकीयांच्या चढाईपासून स्वकीयांचें आणि स्वत्वाचें संरक्षण करण्याचा आत्मविश्वास जेव्हां नष्ट होतो, तेव्हां स्वतःभोंवतीं पावित्र्याच्या कृत्रिम कल्पनांचे खंदक खणून त्यांचा संसर्गच मुळीं टाळण्याची दुबळी शक्कल पराभूत मनोवृत्तीचे लोक अंमलांत आणतात. स्वतःच्या अप्रतिहत वेगानें आड येणाऱ्या वस्तुमात्राचा विध्वंस करणाऱ्या जोरदार प्रवाहाला आपल्यांत कोणत्या प्रकारचा ओघ येऊन मिसळत आहे, याची परवा करण्याचे कारण नसतें. पण तोच सांठलेल्या बंदिस्त पाण्याला मात्र बाहेरचा कसलाच संसर्ग चालूं शकत नाहीं. विजिगीषु, प्रबळ राष्ट्र आणि जित, निराश राष्ट्र यांच्या परकीयांकडे पहाणाऱ्या दृष्टींतील फरक अशाच प्रकारचा असतो. परकीयांच्या संसर्गाचें हिंदूंना शतकानुशतकें वाटत आलेलें भय आणि त्यांच्या विटाळाच्या कल्पना या आत्मप्रत्ययाच्या अभावाच्या पोटीं जन्मलेल्या आहेत. परकीयांच्या आक्रमणाविषयींची हिंदूंचीही भीति वाङ्मयाच्या क्षेत्रांत उदात्ततेचा आणि वीरवृत्तीचा आभास उत्पन्न करणारें भाषाशुद्धीचें भंपक नांव घेऊन अलिकडे प्रकट झाली आहे, एवढेंच. विशेष दुःख वाटतें तें या गोष्टीचें कीं, बॅ. सावरकर यांच्यासारख्या, हिंदु समाजाच्या प्रगतीला प्रतिबंधक होणारीं इतर सारीं बंधनें तोडून टाकण्याला प्रवृत्त झालेल्या वीरपुरुषानें असल्या हीनत्वभावमूलक चळवळीचा पुरस्कार इतक्या हिरीरीनें करावा. श्री. क्षीरसागर यांनीं केलेलें भाषाशुद्धिवाल्यांच्या भूमिकेचें खंडन जितकें आवेशपूर्ण, तितकेंच त्यांचा अप्रयोजकपणा सप्रमाण चवाठ्यावर आणणारें व म्हणून मनाला हमखास पटणारें असें आहे.

असो. बहुश्रुतपणा, चिकित्सकबुद्धि आणि खोंचदार भाषाशैली यांनीं

युक्त असा नवीन पिढींतील तरुण साहित्यिकानें लिहिलेला अशा प्रकारचा दुसरा लेखसंग्रह दाखविणें कठीण जाईल. टीकात्मक किंवा चर्चात्मक लेखन हें मार्मिक आणि चतुरस्र व्यासंगाशिवाय शक्य नाहीं; व त्या व्यासंगाला जेव्हां कल्पकतेची जोड मिळते, तेव्हांच अशा प्रकारच्या लेखनांत निर्माणक्षमतेचा विरळ गुण उत्पन्न होऊन, त्याल कलात्मक स्वरूप प्राप्त होतें. प्रस्तुत लेखसंग्रहांत व्यासंग आणि कलात्मकता यांचा स्पृहणीय मिलाफ झाला आहे; व मला आशा आहे कीं, श्री. क्षीरसागर हे, केवळ त्रुटित चर्चात्मक लिखाणावरच समाधान न मानतां, आधुनिक साहित्य आणि साहित्यिक यांच्यावर स्वतंत्र प्रबंध लिहून मराठींतील कलात्मक टीकेचें प्रायः रितें असलेलें भांडार समृद्ध करितील.

गणेशभुवन, नागपूर
ता. २५।७।३७ } ग. त्र्यं. माडखोलकर

# लेखकाची भूमिका.



प्रस्तुत पुस्तकाच्या रूपानें मी माझे लहान मोठे टीकात्मक निबंध महाराष्ट्रीय वाचकांस सादर करीत आहे. हे निबंध वेगवेगळ्या प्रसंगांनीं व उद्देशांनीं गेल्या पांच सहा वर्षांत मिळून लिहिले गेले आहेत. उदाहरणार्थ 'लोकहितवादी' यांजवरील निबंध कर्नाटक छापखान्यामार्फत प्रसिद्ध होणाऱ्या 'अर्वाचीन वाङ्मय–सेवक' या ग्रंथाच्या त्रितीय खंडाकरितां लिहिलेला आहे; तर केळकर, गडकरी, यांजवरील छोटे निबंध विशिष्ट उत्सवप्रसंगाकरितां लिहिले होते. या प्रकारचा पूर्वेतिहास लक्षांत घेतल्यास विषयोपन्यासांतील व निबंधानिबंधांतील फरकाची संगति लावणें सोपें जाईल.

पुस्तकाचें नांव "**व्यक्ति आणि वाङ्मय**" ठेवण्याचें पहिलें कारण म्हणजे, सदर पुस्तकांत ग्रंथावरील टीकेप्रमाणेंच एखादें दुसरें व्यक्तिचित्रहि (अर्थात् ग्रंथकारांचेंच) आलेलें आहे. व दुसरें म्हणजे ग्रंथारंभी उद्धृत केलेल्या टीकातत्त्वांत म्हटल्याप्रमाणें वाङ्मयांत प्रतीत झालेलें रम्य व श्रेष्ठ व्यक्तिमत्त्व विशद करणें हाच वाङ्मयटीकेचा मार्ग या टीकात्मक निबंधसंग्रहांत अवलंबिलेला दिसेल. या भूमिकेवर उभें राहून पुढील लहान मोठे निबंध 'व्यक्ति आणि वाङ्मय' या नामसूत्रांत सहज गोंवतां आले तरी पुस्तकाच्या अखेरीचा भाषाशास्त्रीय भाग त्याच माळेंत घालणें कठीण आहे. याची मला जाणीव आहे व त्याकरितां कांहीतरी युक्तिवाद (*Sophistry*) करीत न बसतां खरें व्यावहारिक कारण सांगूनच मी वाचकांची माफी मागणार आहें. तें कारण म्हणजे मीं आजवर अनेक प्रसंगांनीं अनेक विषयांवर टीकात्मक निबंध लिहिले असले तरी या पुस्तकांतील विषयांची निवड करतांना मीं माझ्या डोळ्यांपुढें वाङ्मयाचे प्रौढ आणि प्रगत विद्यार्थीच ठेविले होते या दृष्टीनें पाहतां लोकहितवादीवरील दीर्घ व परिश्रमपूर्वक लिहिलेला निबंध जसा लोकहितवादींच्या वाङ्मयाच्या अभ्यासास नेहमींच उपयुक्त ठरले

त्याप्रमाणें भाषाशुद्धिसारख्या सध्यां सार्वत्रिक महत्त्वाच्या विषयावरील निबंधहि ठरतील असा भरवंसा आहे. या दृष्टीनेंच प्रस्तुत टीकात्मक पुस्तकांत या भाषाशास्त्रीय विषयाचाहि समावेश केला आहे. तांबे, लोकहितवादी व भाषाशुद्धि या विषयास या पुस्तकांतील बराच मोठा भाग देण्याचें कारण अर्थातच हे विषय आजच्या वाङ्मयाभ्यासकास अत्यंत महत्वाचे आहेत हेंच होय.

आपल्या मनावर एखाद्या कलाकृतीचे ठसे ज्या क्रमानें व ज्या तऱ्हेनें झाले, त्याचा अनुभव वाचकांस त्याच तऱ्हेनें घडवावयाचा ही एक प्रकारची टीका-पद्धति आहे. हिला Impressionist किंवा संस्कारात्मक पद्धति असे म्हणतात. विशिष्ट प्रसंगानें लिहिलेल्या व संक्षिप्त टीकालेखनांस ही पद्धति विशेष अनुकूल आहे. म्हणून तांबे यांजवरील दोहोंपैकीं एक निबंध, माधव ज्यूलियन यांचें व्यक्तिचित्र, केळकर-गडकरी यासंबंधीचे नैमित्तिक निबंध यामध्यें या Impressionist ह्याताचा उपयोग केलेला आढळेल. तर 'लोकहितवादी'-वरील निबंधांत भावनात्मक अन्तर्भेदापेक्षा अध्ययन व ग्रन्थाधार यावर अधिष्ठित असें पुस्तकी विवेचन आढळेल. विशेषतः लोकहितवादी यांजवरील विवेचनात्मक प्रबंधाकरितां मला जवळ जवळ वर्षभर परिश्रम करावे लागले आहेत. १९३१-३२ सालीं कर्नाटक प्रेसचे रा. गं. दे. खानोलकर यांच्या प्रेरणेवरून मी लोकहितवादी यांचे दुर्मिळ ग्रंथ वाचून प्रस्तुत विषयाचा विशेष अभ्यास केला. या बाबतींत लोकहितवादींचे पणतू पुण्याचे सन्मान्य तरुण नागरिक श्री. विश्वनाथ माधव देशमुख बी. ए. एल्एल्. बी. यांचा मी विशेष ऋणी आहे. कारण ज्या पुस्तकांची एकेकच प्रत आहे, अथवा एकहि प्रत नसल्यामुळें हस्तलिखित प्रत तयार करावी लागली आहे अशा पुस्तकांचा उपयोग करण्याकरितां मी कित्येक महिने दररोज त्यांचेकडे जाऊन बसत असे. अर्थात् आपल्या विख्यात पूर्वजाविषयींचें प्रेम, वाङ्मयकार्याची अभिज्ञता व अभिजात सौजन्य यांखेरीज इतका त्रास कोणीच सोसणार नाहीं हें सांगणें अनवश्यक आहे. लोकहितवादीविषयींचें महाराष्ट्राचें भयंकर अज्ञान व गैरसमज, चिपळूणकरांसारख्या प्रभावी लेखकानें त्याजवर चढविलेले लोकप्रिय हल्ले, व या मानानें अत्यंत अल्प असे त्याजविषयींचें उपलब्ध वाङ्मय या सर्व परिस्थितीचा विचार करतां

एका निबंधाकरितां मला इतके परिश्रम करण्याखेरीज गत्यंतरच नव्हतें. अर्थात् कर्नाटक प्रेसनें योजलेल्या अनेक—खंडात्मक वाङ्मयकोशा-कडून अशा विषयाकरितां मजकडे मागणी आली नसती तर हे परिश्रम घेण्यास मला उमेद आली नसती हें उघडच आहे. व या दृष्टीनें प्रस्तुत वाङ्मयकोशाचे संपादक श्री. खानोलकर यांचे मी आभार मानतों.

प्रस्तुत पुस्तकांतील भाषाशुद्धिविषयक विवेचनास पूर्तता यावी म्हणून भाषाशुद्धीचे निःसीम पुरस्कर्ते प्रो. माधवराव पटवर्धन यांचाहि लेख त्यांच्या उदार परवानगीनें यांत समाविष्ट केला आहे. 'सह्याद्रि' मासिकाचे संचालक श्रीयुत नरसिंह चिंतामण केळकर यांनीं माझे भाषाशुद्धिविषयक लेख या पुस्तकांत समाविष्ट करण्यास आनंदानें परवानगी दिली याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. प्रतिभा, लोकशिक्षण वगैरे ज्या अनेक मासिकांतून माझे लेख घ्यावे लागले त्या मासिकांच्या चालकांचा मी आभारी आहें.

पुस्तकांतील विषयाचें स्वरूप लक्षांत घेतां सुप्रसिद्ध टीकाकार श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर यांची प्रस्तावना घेणें सर्वथा अनुरूप होतें. परंतु त्यांच्या कार्यबाहुल्याचा विचार करतां माझी मनीषा सफल होईल कीं नाहीं याबद्दल मला प्रबल शंका होती. तरी श्रीयुत माडखोलकर यांनीं माझ्या विनंतीला मान देऊन या पुस्तकास आपल्या अधिकारयुक्त प्रस्तावनेचा लाभ करून दिला याबद्दल मी त्यांचा फार ऋणी आहे.

वरील सार्वजनिक संबंधाप्रमाणेंच या पुस्तकाचे कांहीं खाजगी संबंधहि आहेत. त्यांचा उल्लेख करूनहि उतराई होणें कठीण असलें तरी तेवढा एकच मार्ग मोकळा असल्यानें त्यांचाहि कृतज्ञतापूर्वक पण त्रुटित उल्लेख करतों. माझे मित्र गंगाधर भाऊराव निरंतर एम्. ए. यांच्या स्वयंस्फूर्त उत्साहाअभावीं हें पुस्तक प्रकाशनाच्या मार्गाला कदाचित् लागलेंहि नसतं. रा. निरंतर यांनीं दुसऱ्याकरितां किती श्रम घ्यावें याविषयीं कांहींच ठरविलें नसलें तरी सुप्रसिद्ध लेखक व प्रकाशक श्रीयुत यशवंत गोपाळ जोशी ह्यांनीं हें पुस्तक प्रकाशनार्थ घेतल्यामुळें निरंतरांचे बरेच श्रम वाचले. श्री. य. गो. जोशी यांजसारखे रसिक व चतुर प्रकाशक अशा ग्रंथाच्या प्रकाशनाला आपण होऊन

पुढें आल्यामुळें, ज्या माझ्या अनेक मित्रांना एरव्हीं याकरितां अधिक तसदी पडली असती त्यांचे श्रम वाचले आहेत. अशा मित्रांपैकीं प्रमुख म्हणजे आनंदाचे संपादक श्रीयुत गोपीनाथ गणेश तळवलकर हे होत. मला स्वतःला मूळ लिखाण लिहिण्यापलीकडे कोणतीच यातायात करणें शक्य नसल्यामुळें मुद्रण, सजावट, वगैरे यांत्रिक पण महत्त्वाच्या गोष्टींत मी नेहमींच विश्वासानें त्याजवर अवलंबून असतों. त्यांनीं आपल्या नेहमीच्या आस्थेवाईकपणानें या बाबतीकडे लक्ष पुरविण्याची तसदी घेतली याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

ही आभारांची यादी पुस्तक प्रकाशनासंबंधीची असल्यामुळें येथें थांबवितां आली असती, परंतु ज्यांच्या प्रेमळ उत्तेजनाच्या अभावीं या पुस्तकांत समाविष्ट झालेलें मूळ लिखाणच वेळोवेळीं पुरें झालें नसतें, त्या माझ्या वाङ्मयीन आप्तांची येथें आठवण होणें अपरिहार्य आहे. अशा मंडळींत श्रीयुत माधव-राव पटवर्धन यांचें नांव घालतांना मला थोडा संकोच वाटत आहे. पण लेखक म्हणून माधवराव जेवढे मोठे तेवढेच दुसऱ्याच्या लिखाणाचे भोक्ते या नात्यानें ते लहानांत लहान होऊं शकतात हें कितीकांना ठाऊक आहे ? तसेंच माझे मित्र श्री. केशव गणेश ऊर्फ भय्यासाहेब उमराणी बी. ए. व सौ. विमलाबाई भावे यांच्यासारख्या बुद्धिमान् व सहृदय सुहृदांनीं वेळोवेळीं अभिज्ञता दाखविली नसती तर मूळ लिखाण कदाचित् लिहिलेंहि गेलें नसतें.

शेवटीं ' इंदिरा ' प्रेसचे चालक रा. दिवाकर यांनीं पुस्तकाचें काम आस्थेवाईकपणें करून व प्रकाशकाशीं पूर्ण सहकार्य करून पुस्तक अगदीं थोड्या वेळांत उभें केल्याबद्दल त्यांचेहि आभार मानणें जरूर आहे.

प्रस्तुत पुस्तक विश्वविद्यालयीन व इतर वाङ्मयाभ्यासकांस उपयुक्त ठरून विद्वानांच्या आदरास पात्र झाल्यास प्रस्तुत लेखकाच्या श्रमांचें सार्थक झाल्या-सारखें वाटेल.

तुकाराम आश्रम,
टिळकवाडी पुणें.
८-८-३७.

श्रीकृष्ण केशव क्षीरसागर

Literary criticism, Georg Brandes declared, is, in its profoundest significance, psychology—the study of a soul.

* * *

"It was to follow his peculiar undoubted vocation that Sainte--Beuve gave up the practice of the art of poetry. It was only the art he forsook, for poety like an underground spring communicated life and freshness to his critical investigations of even the driest and most serious subjects" ( Brandes on Sainte-Beuve )

# अनुक्रमणिका आणि विषयनिर्देश



## टीकाकार केळकर



## गडकरी यांची लोकप्रियता



## माधव ज्यूलियन ( व्यक्तिचित्र )



## यशवंत ( यशोधन )



## अत्रे ( घराबाहेर )

### आजकालचें नाटयवाङ्मय



## ३

## भाषाशुद्धिवाद

### खरी भाषाशुद्धि आणि तिचे खरे वैरी



**भाषाशुद्धिवाद्यांची भूमिका**—( प्रो. माधवराव पटवर्धन यांचें उत्तर )

**माझ्या भूमिकेचा पुनरुच्चार**— (प्रत्युत्तर आणि समारोप)

# लोकहितवादी
## उर्फ
## गोपाळ हरी देशमुख

लोकहितवादी यांचें नांव आज सामान्य महाराष्ट्रीयास दोनच प्रकरणीं विदित आहे. 'लोकहितवादी' म्हणजे विष्णुशास्त्र्यांनीं लोकद्रोही ठरवून आपल्या तीक्ष्ण वाग्बाणांचें चिरकाल लक्ष्य बनविलें आणि रा. ब. गोपाळ हरी म्हणजे इनाम कमिशनवर काम करून ज्यांनीं आपल्या लोकांचीं वतनें बुडविलीं ते ! तथापि अज्ञानाहूनही घातक असें हें 'ज्ञान' यापुढें फार दिवस टिकेलसें दिसत नाहीं. त्यांचे ग्रंथ दुर्मिळ व त्याहूनही त्यांचे वाचक दुर्मिळ अशी स्थिति आजमितीस दिसत असली तरी त्यांनीं बोलून ठेविलेल्या अप्रिय सत्याचा धैर्यानें स्वीकार करणाऱ्या व्यक्तींची संख्या हळूहळू वाढत आहे. अप्रिय बोलणारावर शिव्यांची लाखोली वाहून लोकप्रियता मिळविण्याचा मोसम कांहीं काळ टिकणें कितीही स्वाभाविक असलें तरी तो मोसम सत्याइतका शाश्वत अथवा प्रभावी होणें सर्वस्वी अशक्य आहे. आणि म्हणूनच अलीकडे लोकहितवादींच्या चरित्राविषयीं, वाङ्मयाविषयीं, व हितोपदेशाविषयीं बरें बोलणें पूर्वींइतकें अशक्यप्राय उरलें नाहीं. त्यांचीं एकदोन आदरपूर्वक लिहिलेलीं चरित्रेंही अलीकडे प्रसिद्ध झाली आहेत आणि क्वचित् त्यांचें एखादें पुस्तक विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत नेमलेलेंही आढळतें. तथापि हें क्रमशः झरणारें अज्ञान म्हणजे या थोर व्यक्तीबद्दलचें व त्यांच्या बोधसागराबद्दलचें यथार्थ ज्ञान मात्र म्हणतां येणार नाहीं.

गोपाळ हरी यांचा जन्म सन १८२३ सालीं पुणें येथें सरदार पराण्यांत

झाला. या घराण्याचें मूळ नांव 'सिधये'. गोपाळरावांचे निपणजे विश्वनाथपंत, कोकणांत दहा बारा गांवांची देशमुखी करून असत. सन १७५४ मध्यें या घराण्यांतील पुरुष पुण्यास नशीब काढण्याकरितां आले. गोपाळरावांचे वडील हरिपंत, हे बापू गोखले यांचे फडणीस होते. शेवटचे पेशवे ब्रह्मावर्तास गेल्यावर हरिपंत पुणें येथें इंग्रजांजवळ पेशव्यांचे वकील म्हणून असत. या सुमारास एलफिन्स्टन् साहेबांनीं काढलेल्या जाहिरनाम्याबरहुकूम पेशव्यांचा पक्ष सोडून हरिपंत गव्हर्नरचे भेटीस न गेल्याकारणानें त्यांची जहागीर जप्त झाली. पण फिरून पेशव्यांचे मध्यस्तीनें ती त्यास मिळाली.

गोपाळराव यास लहानपणीं त्याकाळचे पद्धतीप्रमाणें मोडीबालबोध अक्षर, हिशेब वगैरे शिक्षण मिळालें होतें. त्यांचा विवाह मुंजीनंतर दोनच वर्षांनीं म्हणजे वयाच्या सातव्या वर्षीं झाला. त्यांच्या पत्नी पुणें येथील इनामदार गोळे यांच्या घराण्यांतील होत्या. गोपाळराव लहानपणापासून बुद्धीनें तरबरीत व शरीरानें सुदृढ होते. ते घोड्यावर बसणें, पोहणें, व निशाणबाजी या तीनही मर्दानी कलांत निष्णात होते.

गोपाळरावांचें घराणें खानदानी असलें तरी त्यांच्या लहानपणीं पूर्वींचे दिवस राहिले नव्हते. त्यांच्या वयाच्या तेराव्या वर्षीं ते पितृसुखाला आंचवले व त्याबरोबरच त्यांची जहागिरही—हरिपंतांच्या हयातीपुरतीच ती होती असें कारण देऊन—सरकारनें जप्त केली! अशा स्थितींत या गर्भश्रीमंत बालकास उमेदवारीची नोकरी करावी लागली. तथापि गोपाळरावांनीं खासगी रीतीनें अध्ययन चालूच ठेविलें होतें. अखेर वयाच्या अठराव्या वर्षीं इंग्रजी शिक्षण पुरें करण्याच्या निश्चयानें ते फिरून शाळेंत जाऊं लागले. त्यांचा इंग्रजी अभ्यास वयाच्या एकविसाव्या वर्षीं पुरा झाला. त्या वेळच्या शिक्षणक्रमाप्रमाणें त्यांनीं या वर्षीं स्कूल बोर्डाची शेवटची परीक्षा दिली. या परीक्षेंत परीक्षकांस इतिहास व इंग्रजी या विषयांत त्यांचें नैपुण्य दिसून आलें. ही परीक्षा उतरतांच गोपाळरावास एजंट कचेरींत नौकरी लागली व ते लवकरच अव्वल कारकून झाले. या नौकरीवर असल्यापासूनच गोपाळरावांच्या लेखनास व सार्वजनिक कामगिरीस प्रारंभ झाला. स्कूल-

बोर्डाच्या परीक्षेनंतर दोन वर्षांनीं गोपाळरावांनीं मुनसफीचीही परीक्षा दिली होती. सन १८५२ मध्यें त्यांची वांई येथें मुनसफ म्हणून नेमणूक झाली. यानंतर थोड्या दिवसांनीं इनामकमिशनवर त्यांची नेमणूक झाली. पुढें कांहीं दिवसांनीं मुंबई हायकोर्टमार्फत चालू असलेल्या हिंदुधर्मशास्त्राचें सार (Digest) तयार करण्याचे कामावर त्यांची नेमणूक झाली. सन १८६२ मध्यें मुंबई सरकारनें विशेष शिफारस करून, वर्णभेद मनांत न आणतां त्यांस अहमदाबाद येथें असिस्टंट जज् नेमलें. पण सरकारनें दाखविलेली ही अपवादात्मक गुणग्राहकता येथील सिविल सर्व्हंट मंडळीला पाहवली नाहीं, व त्यांच्या कोलाहलामुळें मुंबई सरकारनें केलेल्या नेमणुकीस स्टेट सेक्रेटरीची मंजुरी मिळाली नाहीं. यापुढें गोपाळराव नाशीक व अहमदाबाद येथें स्मॉलकॉज कोर्टाचे जज होते. त्यांच्या नौकरीचीं बरींच वर्षे (१८६७ ते १८७६) त्यास अहमदाबाद येथें घालवावीं लागलीं, व यामुळेंच त्यांच्या सार्वजनिक कार्याचा बराच भाग अहमदाबादेस पहावयास सांपडतो. १८७६ सालीं दिल्ली दरबारचे प्रसंगीं त्यास रावबहादुर हा किताब मिळाला व सन १८७८ सालीं म्हणजे वयाच्या पंचावन्नाव्या वर्षीं ते नौकरींतून मुक्त झाले.

पेन्शन घेऊन पुणें येथें राहिल्यावर त्यांचा लेखनव्यवसाय पहिल्याहूनही जोरांत सुरू झाला. जुन्या लेखांच्या व व्याख्यानांच्या पुनरावृत्त्या काढणें व नवीन ग्रंथ लिहिणें असा त्यांचा दुहेरी व्यवसाय सुरू असे. याच सुमारास ते मुंबई विद्यापीठाच्या सीनेटचे सभासद होते. या काळांतच त्यांनीं 'लोकहितवादी' हें मासिक काढलें. वाङ्मयाखेरीज इतर चळवळींतही ते बरेंच लक्ष घालीत. आर्यसमाजाशीं त्यांचा निकटचा संबंध होता हें प्रसिद्धच आहे. आर्यसमाजाचे विख्यात संस्थापक स्वामी दयानंद यांनीं आपल्या पश्चात् आर्य समाजाच्या नेमलेल्या व्यवस्थापक मंडळींत (Trustees मध्ये) गोपाळराव हे एक होते. त्यांनीं कांहीं काळ रतलाम संस्थानची दिवाणगिरीही केली पण पुढें ती त्यास वयोमानामुळें सोडावी लागली. त्यांस बरेंच दीर्घ आयुष्य लाभलें होतें व आयुष्याच्या अखेरीपर्यंत ते एक सन्मान्य पुढारी या नात्यानें न्यायमूर्ति रानड्यासारख्यांसही वंद्य वाटत.

त्यांचा अंत वयाच्या एकूणसत्तराव्या वर्षी त्यांच्या उद्योगमय जीवनास साजेसाच झाला. दसऱ्याचे दिवशीं घोड्यावरून सीमोल्लंघनास गेले असतां त्यांस ताप आला व त्या दुखण्यांतच त्यांचा अंत झाला. इंग्रजींत Dying in the harness ( लढतां लढतां मरण ) हा मरणाचा एक स्पृहणीय प्रकार गणतात. या स्पृहणीय प्रकाराचें हें एक अक्षरशः उदाहरण म्हणावयाचें !

गोपाळराव जात्याच कुशाग्रबुद्धीचे, करारी व कर्तबगार होते. त्यांतून नुकत्याच होऊन गेलेल्या राज्यक्रान्तीचीं चिन्हें त्यांच्या काळीं सभोंवार ताजीं होतीं. अशा स्थितींत त्यांच्या दीर्घोद्योगाचा ओघ अनेक मुखांनीं लोकहिताकडे वळावा यांत नवल नाहीं. वरवर पाहाणारास, ज्या काळीं आजचीं विद्यापीठें, आजचीं वर्तमानपत्रें, व आजच्या पदव्या नव्हत्या अशा काळीं आरंभापासूनच ‘ लोकहितवादित्वाची ’ भूमिका स्वीकारून अनेकविध चळवळी करणाऱ्या या पितामहाच्या कामगिरीची चांगलीशी कल्पना येत नाहीं. तर सूक्ष्म दृष्टीनें विचार करणारास अशा काळींही या पुरुषानें किती दूरचे पाहिलें व आजच्या साधनांच्या व संधींच्या अभावींही केवढें कार्य केलें याचें सादर आश्चर्य वाटतें. लोकहितवादी यांस, इंग्रजी, संस्कृत, फारशी, गुजराथी व हिंदी या भाषा उत्तम अवगत होत्या. हिंदु लॉचें सार तयार करीत असतां त्यास, कायदा, धर्मशास्त्र, व समाजशास्त्र या तिहींचीही मूल तत्त्वें संशोधकाच्या दृष्टीनें आकलन करण्याची अपूर्व संधि प्राप्त झाली होती. शिवाय इनाम कमिशनवर काम करीत असतांही अनेक जुन्या व्यक्तींशीं व कागदपत्रांशीं त्यांचा संबंध आल्यामुळें आपल्या समाजाच्या जुनाट धाग्याकडे त्यांचें लक्ष सहजच अधिकाधिक वळूं लागलें. याखेरीज नौकरीच्या अथवा इतर कामाच्या निमित्तानें त्यास कोणत्याही नवीन ठिकाणीं जाण्याचा प्रसंग येतांच ते तेथील जुन्या जुन्या व वतनदार मंडळीस बोलाऊन घेऊन त्यांचेकडून शक्य तितकी उपयुक्त माहिती जमा करीत असत. त्यांच्याजवळ हजारों दुर्मिळ ग्रंथांचा व कागदपत्रांचा संग्रह होता. त्यांस वैद्यक, गायनवादन, वगैरे जुन्या शास्त्रांचीही माहिती होती. इतक्या गोष्टी लक्षांत

घेतल्या असतां त्यांच्या लिखाणांत दिसून येणाऱ्या कल्पनातीत बहुविधतेची थोडीबहूत संगति लागते.

आज मितीस महाराष्ट्रांत ज्या संस्था मान्यता पावल्या आहेत, त्यांतील जुन्यांत जुन्या संस्थांचे प्रत्यक्ष संस्थापक अथवा गुप्त प्रेरक गोपाळ हरीच होते. पुण्यांतील ज्ञानप्रकाश, नेटिव्ह जनरल लायब्ररी, हुजुर पागा ( मुलींचें हायस्कूल ) या सारख्या संस्था त्यांच्याच खटपटीनें स्थापन झाल्या. मुंबई येथील 'इंदुप्रकाश' पत्राच्या संस्थापनेंतही लोकहितवादींची खटपट होतीच. आर्य समाजाशीं व अहमदाबाद येथील अनेक उपयुक्त चळवळींशीं गोपाळरावांचा निकट संबंध होता. पुनर्विवाह प्रकरणांत गोपाळराव प्रमुख होते व त्यांसाठीं त्यास कांहीं दिवस सामाजिक बहिष्कारही सोसावा लागला.

परंतु यांपैकीं कित्येक उद्योगांचा त्या काळाइतका आज बोलबाला होणें शक्य नसल्यामुळें अथवा जनतेच्या विस्मरणशीलतेमुळें आज मितीस आपणास त्यांच्या वाङ्मय–कार्याचें जितकें रूप स्पष्ट दिसेल तितकें इतर कार्याचें दिसणार नाहीं. शिवाय त्यांच्या वाङ्मयाचा बराच भाग तत्कालीन समाजाच्या जागृतीला वाहिला असल्यामुळें त्यांचें वाङ्मय ही एकप्रकारची चळवळच होय ! तथापि त्यांच्या बहुतेक लिखाणांत त्यांची ज्ञानलालसा व लोकोद्धाराची इच्छा यांचा अपूर्व संगम पहावयास सांपडतो. वरवर पाहणारास बहुरूपी वाटणारे त्यांचे लेखन–विषयही या दोन सदरांत कोठें ना कोठें बसतात, असें दिसून येऊन विसंगत अथवा अस्थानीं वाटत नाहींत. हा दृष्टीनें त्यांच्या लेखनाचें स्थूल मानानें पुढीलप्रमाणें विभाग पडतात.

( १ ) **समाज जागृतिपरः**—लेख, निबंध, व्याख्यानें.

( २ ) **ऐतिहासिकः**—स्वतंत्र, इतर भाषांतील ग्रंथांच्या आधारें, व अस्सल कागदपत्र, दंतकथा वगैरेवरून संशोधक बुद्धीनें लिहिलेले.

( ३ ) **धार्मिकः**—प्राचीन धर्मग्रंथाचें उज्वल स्वरूप दर्शविणारें व

अवनत काळांतील ग्रंथांचें विपरीतत्व व हीनत्व प्रस्थापित करणारे.

( ४ ) राजकीय:—इंग्रजी अमदानींतील राजकीय परिस्थितीचें यथार्थ परीक्षण करणारे.

( ५ ) केवळ बहुश्रुतता वाढविणारे ( Polite literature. ) ( सुभाषितें, विद्यालहरी, गुलिस्तान इ० ).

यांपैकीं बहुतेक ग्रंथ आजमितीस दुर्मिळ आहेत. कांहींची एकच प्रत आहे तर कांहींच्या प्रती नष्ट झाल्यामुळें उद्योगी लोकांनीं हस्तलिखित प्रती करून ठेविल्या आहेत. त्यांच्या प्रमुख ग्रंथांच्या स्थूल निरीक्षणानेंही त्यांची कुशाग्रबुद्धि, असामान्य ज्ञानसंग्रह, व विलक्षण लोकहितलालसा यांची साक्ष पटते.

लोकहितवादींच्या ग्रंथांत त्यांच्या शतपत्रांस व निबंधसंग्रहास अग्रस्थान दिलें पाहिजे. त्यांचीं पत्रें प्रथम १८४८ मध्यें प्रसिद्ध होण्यास सुरवात झाली. हीं पत्रें त्यावेळीं मुंबई येथें भाऊ महाजन यांच्या संपादकत्वाखालीं निघणाऱ्या 'प्रभाकर' नामक साप्ताहिकांत प्रसिद्ध होऊं लागलीं. पुढें पेन्शन घेतल्यानंतर त्यांनीं हीं पत्रें व "वृत्तवैभव" "इन्दुप्रकाश" वगैरे पत्रांतील लेख मिळून सुमारें अकाराशें पानांचा शिळाप्रेसवर छापलेला प्रचंड ग्रंथ प्रसिद्ध केला. हा ग्रंथ आजमितीस पाहणारास एखाद्या ज्ञानकोशाप्रमाणें वाटल्यावाचून राहणार नाहीं. तत्कालीन ब्राह्मणांची स्थिति, धर्माची अवनति, अव्वल इंग्रजींतील राजकीय स्थिति, लोकांच्या हाडीं खिळलेल्या पुराणांतील घातुक कल्पना, प्राचीन आर्यांचें वैभव, मद्यपाननिषेध, परदेशी मालाची चटक वगैरे शेंकडो विषय या संग्रहांत येऊन गेले आहेत. या संग्रहांतील पहिला भाग पत्रांचा असून त्यांचा आरंभ बहुधा "विनंतिविशेष" या मामुली मायन्यानें व अन्त "कळावें" या शब्दानें म्हणजे खरोखरीच्या पत्रासारखा होतो. खालीं 'लोकहितवादी' अशी सही आढळते. पत्रांची भाषाही पत्रासारखीच साधी किंचित् तुटक पण जिव्हाळ्याची अशी वाटते. परंतु या लेखसंग्रहांत येऊन गेलेल्या विषयांकडे पाहिलें म्हणजे हे विषय

इतक्या सोप्या भाषेंत त्यांस कसें मांडतां आले याचा आचंबा वाटल्यावांचून राहात नाहीं. "लांच" "डोले करण्याची चाल" यासारख्या विषयापासून ते "विधिनिषेधरूप धर्माचें मूळ" "बुद्धीनें ईश्वर किती कळतो त्या विषयीं" या सारख्या वेदान्तपर विषयापर्यंत सर्व विषय साधारणमानानें चार पानांच्या मर्यादा देत बसविले आहेत ! लोकहितवादी हे माहितीचे तर आगरच होते. "यहुदी लोकांचें मूळ" "मलबारी ख्रिस्त्यांचें मूळ" ऋक्संहितेंत अक्षरें किती आहेत, पानशांच्या घरीं 'बोडक्या' किती होत्या यासारखी विविध माहिती या आकाराशें पानांतील प्रत्येक लेखांत भरलेली आढळेल.

या ग्रंथाच्या खालोखाल महत्त्वाचें पुस्तक म्हणजे **'स्वाध्याय'** हें होय. वास्तविक एका दृष्टीनें स्वाध्याय या ग्रथासच लोकहितवादींच्या पुस्तकांत अग्रस्थान द्यावें लागलें असतें. परंतु निबंधसंग्रहांत यापैकीं बरीच माहिती व मूलभूत विचार येऊन गेल्यामुळें निबंधसंग्रहानंतरच याची गणना करावी लागते. या ग्रथाची कल्पनाच सर्वस्वी अभिनव आहे. आर्यांच्या प्राचीन ग्रंथांची माहिती व अभिमान प्रत्येक आर्यास असणें जरूर आहे ही दृष्टि ठेऊन लोकहितवादींनीं प्रस्तुत ग्रंथाची मांडणी केली आहे. यांत श्रुति, स्मृति, पुराणें, यांची सुव्यवस्थित व चिकित्सकबुद्धीनें दिलेली माहिती आढळते " संहिता म्हणजे काय ? " " मैत्रायणी शाखा म्हणजे काय ?" " शैव कोण ? वैष्णव कोण ?" " मंत्र विनियोग कशास म्हणतात ?" "प्रत्येक वेदांचें व पुराणांचें आरंभीचें वचन" यासारखी प्रत्यक्ष परिचयात्मक माहिती या ग्रंथांत दिलेली आहे. माहितीच्या दृष्टीनें हरएक जिज्ञासूस प्रस्तुत ग्रंथ आर्यसंस्कृतीचें "Hand book" अथवा "Directory" याप्रमाणें उपयुक्त संदर्भग्रथ वाटेल यांत शंका नाहीं. या ग्रंथाचें परिशीलन करणारास लोकहितवादींचा दीर्घोद्योग, जिज्ञासा, व आर्यसंस्कृतीचा योग्य अभिमान याविषयीं यथायोग्य कल्पना येईल. पण सर्वाहून अधिक म्हणजे प्रस्तुत ग्रंथाची कल्पना व रचना इतकी स्वतंत्र व अभिनव आहे कीं, या एका ग्रंथावरूनहि लोकहितवादींचें नांव संशोधक व धार्मिक सुधारक म्हणून महाराष्ट्रांत चिरस्थायी झालें असतें.

तथापि अशा गंभीर विषयांसही लोकहितवादींच्या बहुश्रुतपणामुळें व रसाळवाणीमुळें किती मनोरंजक स्वरूप प्राप्त होऊं शकतें हें हा ग्रंथ वाचणारासच समजण्यासारखें आहे. जटापाठ व घनपाठ म्हणजे काय हें समजाऊन देतांना ग्रंथकारांनीं "सा री ग म" चीं आवर्तनें करून दाखविलीं आहेत! त्याचप्रमाणें पुढील ज्ञानकण पहावें,—"ऋषी म्हणजे फिरस्ते व कवी म्हणजे सुंदर रीतीनें वाक्यें जोडणारे.", "स्मृतींत जितका व्यवहार वर्णिला आहे तितका श्रुतींत नाहीं." "मंत्राच्या संहिता म्हणजे जमाव" अशा बालबोध वचनांत वैदिक संशोधनाचीं बीजें विखुरलेलीं पाहिलीं म्हणजे आश्चर्य वाटल्यावाचून राहात नाहीं. "संहिता" "आरण्यकें" "नामदेवाचें मत" "विधवा विवाह" "जैनमत" "भूगोल" "राज्यमीमांसा" "प्रस्तुतची राज्यव्यवस्था" ही या पुस्तकांतील कांहीं प्रकरणें होत. ग्रंथाच्या शेवटीं एक प्रश्नोत्तरावली देऊन लोकहितवादींनीं आपली धार्मिक मतें निश्चित सांगितलीं आहेत. या सबंध ग्रंथांतील धार्मिक मतांचा इत्यर्थ पाहिल्यास "आपण होतों कोठें व आलों कोठें याचा विचार करा." "धार्मिक विधीपेक्षां नीतीला महत्त्व द्या." वगैरे त्यांच्या निबंधसंग्रहांतील मतांप्रमाणेंच आहे. पुराणग्रंथावर यांतही झोड उठविलेली आढळते. "अग्नि हा जड पदार्थ असून त्यांत जें टाकलें तें तो जाळतो, हा जो त्याचा स्वभावधर्म त्याचा दृष्टान्त ईश्वर जो चैतन्यरूप व ज्ञानमय त्यास लागत नाहीं." यासारख्या नैय्यायिकी थाटाचे कोटिक्रमही त्यांत आहेत, तर "पुराणांत तीर्थादिकांचे इतके जरी प्रस्ताव दिले आहेत तरी अशीं तीर्थयात्रादिकेंकरून कसाही पापी पुरुष शुद्ध होण्याच्या प्रतिज्ञा गायिल्या आहेत त्याप्रमाणें कोणीही पश्चातापी वाटलेल्यास शुद्ध करून घेत नाहींत." यासारखे सरळ व सहज पटण्यासारखे युक्तिवादहि जागजागीं आहेत.

•

याच्या खालोखाल महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे आश्वलायन गृह्य सूत्रांचें भाषांतर. लोकहितवादींच्या प्रत्येक पुस्तकाचा हेतु आर्यांच्या धर्माचें व समाजाचें प्राचीन स्वरूप प्रगट करणें व खरा धर्म कोणत्या स्वरूपाचा आहे हें शिकविणें हा असल्यामुळें या ग्रंथाच्या आरंभीं त्यांनीं सुमारें त्रेपन्न पानांची सूक्ष्म

विचारांनीं भरलेली प्रस्तावना जोडली आहे. तींत त्यांनीं आर्यांच्या धार्मिक संस्कारांचें रहस्य वर्णिलें आहे.

याखेरीज त्यांच्या ' गीतातत्त्व ' नामक ग्रंथासही त्यांच्या धार्मिक ग्रंथांत महत्त्वाचें स्थान द्यावें लागेल.

वस्तुतः एवढ्या ग्रंथांच्या वर्णनानंतर त्यांच्या इतर विषयांवरील महत्त्वांच्या रचनेकडे वळण्यास हरकत नाहीं. परंतु दुर्दैवानें त्यांस आणखी एका चमत्कारिक विषयाविषयीं माहिती गोळा करून ग्रंथ लिहावा लागला होता. तो विषय म्हणजे " शाक्तपंथ " व तो ग्रंथ म्हणजे " आगम-प्रकाश. " विषयाचें नांव ऐकतांच आजच्या पिढीस लोकहितवादींनीं ही उठाठेव कशाला केली, असें वाटण्याचा संभव आहे. निदान प्रस्तुत विषयाचा लोकहितांशीं संबंध असूं शकेल हें देखील आज सहजासहजीं खरें वाटत नाहीं. परंतु शाक्तसंप्रदायाचा उघड किंवा गुप्त प्रभाव अद्यापि हिंदूंच्या वेगवेगळ्या विधींत व समजुतींत किती आहे हें जो चौकसपणें पाहील त्यास या विषयाचा लोकहितांशीं अद्यापही निकट संबंध आहे असें दिसून येईल. लोकहितवादींच्या पिढींत तर प्रत्यक्ष शाक्तपंथही बराच जोरावला होता, व त्यायोगें बाजीरावींत आधींच शिथिल झालेला पुणेरी ब्राह्मणसमाज उघड उघड अनाचाराला धर्मांत स्थान देऊं लागला होता. कोणतीही पापरूढी धर्माच्या आश्रयानें किती सुखरूप फोफावते हें हिंदू लोकांस तरी निराळें सांगावयास नको. त्यांतून या शाक्तपंथानें गुप्तपणाचें अवगुंठणही पेहेरलेलें ! अशा स्थितींत त्याची माहिती गोळा करणें लोकहितवादींसारख्या उघड चिकित्सकांस किती दुरापास्त झालें असेल याची कल्पना आजच्या पिढीस येणें सोपें नाहीं. लोकहितवादी शिक्षण संपवून नोकरी व सार्वजनिक कार्य याकडे वळण्याच्या सुमारास पुण्यांत हा पंथ चांगलाच गाजला होता. हा गुप्तपंथ लोकांच्या डोळ्यावर येण्याचें तात्कालिक कारण म्हणजे या सुमारास या पंथाचे दोन स्वामी पुण्यास येऊन राहिले होते. व त्यास अनेक अनुयायीही मिळाले होते. या गुप्तपंथानें थोडे उघड डोकें वर काढतांच पुण्यांत त्यासंबंधीं दोन तट पडले,

आश्चर्याची गोष्ट म्हणजे केवळ वाममार्गी लोकांचीच या पंथास सहानुभूति होती असें नाहीं; वाममार्गी नसलेले शुचिर्भूत विद्वानही " या प्राचीन शिव-प्रणीत पंथास बहिष्कृत कसें ठरवावें ? " म्हणून बहिष्काराच्या चळवळीस प्रतिकूल होते. त्याकाळीं अखिल महाराष्ट्रांत प्रमाण गणले जाणारे पुण्यांतिल एक सर्वस्वी " दक्षिण—मार्गी " शास्त्रीही वरील हास्यास्पद कारणास्तवच वाममार्गाविरुद्ध बोलूं धजत नव्हते व एवढ्याचकरितां या विपरीत पक्षांत समाविष्ट झाले होते. एवंच कित्येक प्रत्यक्ष आचरणांत तर कित्येक केवळ बुद्धीनें याकाळीं कसे भ्रष्ट झाले होते तें दिसून येईल. अशा वेळीं शाक्तपंथांत किती हीन गोष्टींचा समावेश होऊं शकतो व त्यांचा गुप्त वा उघड संपर्क हिंदु धर्मास किती प्रमाणांत पोहोंचत आहे यासंबंधीं शोधपूर्वक संशोधन करणें अत्यंत जरूर होतें. पण हें संशोधन व त्याचें प्रकाशन बरेंच दुर्घट व धोक्याचेंही होतें. कारण या पंथाचे अनुयायी आपण शाक्तपंथीय आहोंत हें कधींच कबूल करीत नसत व आपल्या पंथाचे ग्रंथ पंथबाह्यास दाखवीत नसत. इतकेंच काय पण जो अशा ग्रंथाची नुसती चौकशी करी त्याचीच उलट नालस्ती करीत. अशा गृहस्थासच उलट शाक्तपंथीय ठरविणें हा त्या नालस्तीचाच एक प्रकार असे ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे! अशा परिस्थितींत लोकहितवादींनीं या नालस्तीस भीक न घालतां हें लोककार्य चिकाटीनें पार पाडलें.

या ग्रंथांत लोकहितवादींनीं अनेक ग्रंथाच्या आधारें या पंथाची दुर्मिळ माहिती ग्रथित केली आहे. लोकनीतीच्या दृष्टीनें ही माहिती चव्हाट्यावर येणें किती जरूर होतें हें कळण्यास शाक्तांच्या आचाराविषयीं थोडी माहिती असणें जरूर आंहे. तथापि ही माहिती ज्या स्वरुपांत मूळ ग्रंथांत आढळते त्या स्वरुपांत आज प्रसिद्ध करणें हें सभ्यतेच्या मर्यादेबाहेरील आहे. या ग्रंथांतील सौम्यतम विधींचें शक्य तेवढ्या सभ्य भाषेंत वर्णन करणें देखील बरेंच किळसवाणें होईल. तरी चारदोन थेंबावरूनही या गलिच्छ गटाराची कल्पना करतां येईल. जें जें गलिच्छ तें तें या पंथाच्या ग्रंथांनीं तीर्थासारखें पवित्र मानलें आहे. मद्यपान व व्यभिचार हीं यांचीं महापुण्यें होत. एव-

ळ्यानेंच समाधान न होऊन व्यभिचार व मद्यपान यांतही यांनीं पुण्यप्राप्तीच्या दृष्टीनें नंबरवारी लाविली आहे. साधारण मद्यास्वादाहून ओकेपर्यंत दारू पिण्याचें माहात्म्य मोठें वर्णिलें आहे! व्यभिचारविधींत अर्थातच चांडाल स्त्रिया व रजस्वला यास काशी–प्रयागादी तीर्थांची पदवी देण्यांत आली आहे! यांचें पूजेचें साहित्य म्हणजे मद्य, मत्स्य, मांस, मैथुन व मुद्रा हे पंच 'मकार' होत. एवढ्या गोष्टीही या पंथाचें किसळवाणें स्वरूप दर्शविण्यास पुऱ्या आहेत. पण ही केवळ अनाचार–मालिका झाली व यांत विषयसेवन हा तरी हेतु म्हणतां येईल. परंतु या पंथाचे ग्रंथांत असे कित्येक विधी आहेत कीं, ज्यांचे बुडाशीं विषयसेवनाचाही हेतु सांपडत नाहीं. ते केवळ गलिच्छपणा व बीभत्सता यांच्या आवडीमुळेंच उद्भूत झालें असलें पाहिजेत! आणि हे सर्व प्रकार शिवानें पार्वतीस सांगितले म्हणून वर्णिले आहेत! मैथुनाचें वेळीं जपजाप्य, जपाला मनुष्याच्या दांतांची माळ, प्रेताशीं संभोग इत्यादि अनुच्चारणीय प्रकार या ग्रंथांत धार्मिक विधि म्हणून सांगितले आहेत. पण प्रकारांचें वर्णन प्रसिद्ध करून लोकांची पापी जिज्ञासा भागविण्याचा लोकहितवादींचा उद्देश नव्हता. याहि ठिकाणीं आर्यांचा उज्वल प्राचीनकाल, लज्जास्पद मध्यकाल आणि निराशमय वर्तमान काल हीच त्रयी त्यांच्या डोळ्यांसमोर होती. "निर्वाहाच्या साधनांची माहिती नाहीं. साखर पैसा टाकला म्हणजे मिळते या पलीकडे नित्यनिर्वाहाच्या जिनसांचीही माहिती नाहीं अशा लोकांस वशीकरणाचा खटाटोप कशाला?" अशा अर्थाचें उद्गार त्यांनीं आपल्या नेहमींच्या कळवळ्यानें काढले आहेत. ज्यांच्या पूर्वजांनीं तर्क, वेदान्त, व्याकरण, औषधीविद्या, ज्योतिष वगैरे विषयांचे दीप प्रथम या भूमंडलावर लावले त्यांनींच प्रेताच्या कवटींत शत्रूची विष्टा घालून "ओम् ऱ्हीम् ऱ्हाम्" मंत्र जपला असतां शत्रूचा फडशा होतो अशा प्रकारचे लज्जास्पद विधि कल्पिले! लोकहितवादी उद्वेगानें लिहितात, "एकंदरींत ब्राह्मण ग्रंथकारांनीं आपल्या विद्येची पूर्तता आगमशास्त्रासारखे ग्रंथ करून केली हें पाहून त्यांच्या ऱ्हासकालाचें पूर्ण अनुमान होऊन वाईट वाटतें!"

याखेरीज या ग्रंथांत शाक्तपंथानें हिंदूंच्या नित्यकर्मांतहि कसा चंचुप्रवेश केला आहे याचा विचार करतांना लोकहितवादींनीं आपली नेहमीची सूक्ष्म संशोधक बुद्धि दाखविली आहे. व शेवटीं दिल्लीकडील संत निश्चलदास व महाराष्ट्रीय संतश्रेष्ठ तुकाराम यांनीं या मार्गाचा कसा निषेध केला आहे हें दाखवून लोकहितवादी विचारतात, " पंडितांनीं आपल्या विद्वत्तेचा विनियोग हा हीन मार्ग खंडित करण्याकडे कधीं केला होता काय ? "

लोकहितवादींचें लक्ष प्रथम समाजस्थितीकडे व धर्मस्थितीकडे वळलें हें खरें असलें तरी हळूहळू राजकीय व आर्थिक परिस्थितीचे विचार त्यांच्या डोक्यांत आल्यावाचून राहिले नाहींत. ब्रिटिश अंमलामुळें हिंदुस्तानचें आर्थिक दृष्टया केवढें नुकसान होत आहे याची जाणीव त्या काळांतही ज्या थोड्या दूरदृष्टीच्या पुढाऱ्यास होऊ लागली होती, त्यांतच लोकहिवादी यांची गणना केली पाहिजे. या प्रश्नाकडे लोकांचें व सरकारचें लक्ष वेधण्याकरितां त्यांनीं ' इन्दुप्रकाशां'त हिंदुस्तानच्या आर्थिक परिस्थिती-विषयीं आठ पत्रें छापलीं होतीं व तींच पुढें पेन्शन घेण्याच्या सुमारास त्यांनीं पुस्तक रूपानें प्रसिद्ध केलीं. " हिंदुस्तानास दारिद्य्र येण्याचीं कारणें आणि त्यांचा परिहार व व्यापारविषयक विचार " या लांबलचक वर्णनपर नांवावरूनच सदर पुस्तकाच्या अन्तरंगाचा बराच बोध होण्यासारखा आहे. इतर पुस्तकाप्रमाणें लोकहितवादींच्या याहि पुस्तकांतील विचार बीजस्वरूपानें त्यांच्या निबंधसंग्रहांत व शतपत्रांत सांपडतात. तरी या पुस्तकांत त्यांनीं ब्रिटिश आमदानींतील आर्थिक परिस्थितीवर अत्यंत मार्मिक व सुगम विचार ग्रथित केलेले आढळतात. 'रयतेची असहाय स्थिति' ' विलायती मालाची गर्दी ' 'देशाच्या डोक्यावरील कर्जाचा बोजा' 'हिंदी नोकरांच्या डोक्यावरील विलायती मानकरी ' 'दर्यापार माहेरी परत चाललेली लक्ष्मी केवळ कारकुनीसाठीं अर्जदार वाढविणारी इंग्रजी विद्या' 'पाश्चात्त्य राज्यानें हिंदुस्तानावर केलेली यांत्रिक चढाई' ' विलायती ब्राह्मणास द्यावा लागणारा वीस कोटींचा हविर्भाग ' वगैरे अनेक महत्त्वाच्या गोष्टींवर या ग्रंथांत

लोकहितवादींनीं बालबोध पण भेदक शद्बांत स्वतंत्र विचार व्यक्त केले आहेत. यांपैकीं कांहीं प्रश्नाचा विचार यापूर्वीं अर्वाचीन हिंदी राष्ट्राचे आद्य राजकारणी पुढारी दादाभाई नवरोजी यांनीं केला होता व त्यांचा लोकहितवादींनीं आपल्या पुस्तकांत उल्लेखही केला आहे. शिवाय लोकहितवादी यांनीं महाराष्ट्र व गुजराथ येथील गरीब रयतेच्या राहणीचें केलेलें सूक्ष्म अवलोकनही यांत पहावयास सांपडतें. कुणब्याच्या बिकट स्थितीचें वर्णन करतांना लोकहितवादी लिहितात, " लग्नकार्य अथवा.कज्जे खटले याकरतां थोडा जादा खर्च होतांच, त्यास सावकाराचें घर पाहावें लागतें. शंभर कर्ज काढलें म्हणसे स्टांप, लिहिणावळ वगैरे जाऊन ब्याणव हातीं पडतात. हुकूमनामा झाल्यावर पैसे भरण्यास उशीर होतांच मोट जप्त होऊन नाझर कचेरींत पडते व तेथें उंदरांनीं खाऊन तिची खराबी केल्यावर तिची किंमत चतुर्थांशही येत नाहीं ! " त्याचप्रमाणें इंग्रजी अमलांतील आबादीचें वर्णन करतांना ते लिहितात, " बडे लोक अधिकार गेल्यामुळें रडतात व रयत कारभारामुळें रडते ! "

गुजराथेंतील विणकऱ्यांचें वर्णन करतांना ते लिहितात " वाणा व ताणा यांच्या रेशमाची नंबरवारी......व काठाची नक्षी योजणारे घनपाठयाप्रमाणें स्मरणशक्तीचे असतात. "

ही सर्व परिस्थिती रंगवून लोकहितवादींनीं लोक व सरकार यांस उद्देशून कळकळीनें व दूरदर्शीपणाचे उद्गार याहीं ग्रंथांत जागजागीं काढले आहेत. ते म्हणतात " राजांचा व भटांचा जाच दूर झाला आहे अशा वेळीं इंग्रजांचें कर्तव्य एकच ! देश धनवान् झाला पाहिजे, स्वतंत्रतेस आला पाहिजे; **या देशांत पार्लमेंट स्थापन झालें पाहिजे.** तरच राज्य दीर्घायु होईल."......" इंग्रजांचें उपकार फार यास्तव त्यास योग्य सल्ला न देतील ते त्यांचे शत्रू. म्हणून तक्रारी ऐकून प्रजेची बहादरी करावी ही प्रार्थना. "......" मुलुख विलायतचा नाहीं, इथल्या लोकांनीं सर करून दिला. त्यांचा भरवसा तुटला म्हणून चौदा हजाराबद्दल ऐंशी हजार सोजिरांचा भुरदंड सोसावा लागतो. हें लक्षण बरें नव्हें. "......" मिसरी

कापडावर जकात बसवून देशी बारीक कापडाच्या मार्गांत अडचणी घालाव्या हें बरें नव्हे. परिणामीं विषासारखें आहे. "... "ह्या देशचे लोकांनीं कितीही बुद्धिमत्ता वा इंग्रजी भाषा प्रभुत्व दाखविलें तरी चीज नाहीं. "......" मत्सर तर इतका कीं, ब्राह्मण जेवावयास निषेध धरतो पण साहेब लोकांचा नियम असा आहे कीं, नेटिव लोकांशीं कोणताही व्यवहार ठेवला कीं त्यास वाळींत !" ...... "लोकांची भक्ति उडत चालली. सर दिनकररावांसारखे म्हणतात, इंग्रजांच्या शद्बांस वजन नाहीं. हिताकरितां कायदा करतो म्हणून प्रसिद्ध झाले कीं, लोकांस भय पडलें !" "मलिकंबर, तोडरमल्ल यांचा मार्ग सोडणारे रेव्हिन्युसर्वेवाले यांनीं सर्व देश जर्जर केला." अशा शद्बांत त्यांनीं इंग्रजी राज्याविरुद्ध गाऱ्हाणें गायिलें आहे. लोकांच्या तर कानीं कपाळीं ते सदैवच ओरडत होते "**घनपाठीस बक्षीस द्यावें कीं साखरेचा हुन्नर करणारांस?**" शिंदे होळकर पूर्वीं मोहिमेसाठीं दागिने गहाण ठेऊनही पैसा उभा करीत त्याचें स्मरण देऊन लोकहितवादी म्हणतात—"या कामांत सरकारची आशा धरूं नका....... शिंदे होळकरांनीं पूर्वींप्रमाणें दागिने गहाण ठेऊन या ( यांत्रिक ) चढाईवर हल्ला करावा."

याप्रमाणें या पुस्तकांत जागोजागीं दूरदृष्टि व तळमळ दाखविणारे उद्गार आढळतात. त्याबरोबरच आतां सर्वमान्य झालेले, पण त्या काळीं भीत भीत उच्चारावे लागणारे हिंदुस्तानच्या आर्थिक स्थितिविषयींचे सिद्धान्त लोकहितवादींनीं शास्त्रशुद्ध पुराव्यांनिशीं प्रथम याच ग्रंथांत मांडले आहेत. ते म्हणतात "ज्या देशाची "रवानगी" ( निर्यात ) ही आमदानी ( आयात) पेक्षां अधिक आहे तो देश दरिद्रीच म्हटला पाहिजे."

धार्मिक, सामाजिक व राजकीय विषयांप्रमाणेंच लोकहितवादींनीं ऐतिहासिक विषयावरही बहुमोल ग्रंथ लिहून ठेविले आहेत. महाराष्ट्र, गुजराथ रजपुताना, इतकेंच काय पण लंकेच्या इतिहासावर त्यांनीं ग्रंथरचना केली हें पाहून त्यांच्या व्यापक दृष्टीचें आश्चर्य वाटल्याखेरीज राहात नाहीं. तथापि त्यांची असामान्य संशोधकबुद्धि व राष्ट्रीय दृष्टि यांची माहिती असणारास ते या विषयाकडे कसें वळले याचें मात्र आश्चर्य वाटणार नाहीं.

अशा ऐतिहासिक ग्रंथापैकीं महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे उदयपूरचा इतिहास हा कर्नल टॉड यांच्या "Annals of Rajastan" या प्रसिद्ध ग्रंथाच्या आधारें लिहिला आहे. तथापि या ग्रंथांस जागजागीं जोडलेल्या टीपांतही लोकहितवादींचा असामान्य ज्ञानसंग्रह दिसून येतो. सदर ग्रंथांत जागोजाग प्राचीन हिंदूंच्या गुणदोषांविषयीं मार्मिक विचार व्यक्त केलेले आढळतात. या खेरीज ब्रीगच्या हिंदुस्तानच्या इतिहासाचेंही भाषांतर त्यांनीं केलें आहे. त्यांतील मुसलमानी धर्माविषयींची सुमारें दीडशे पानांची प्रस्तावना फारच महत्त्वाची आहे. पण तीहि मूळग्रंथकाराचीच असल्यामुळें लोकहितवादींच्या विचारांचें अध्ययन करणारांस तिचें फारसें महत्त्व नाहीं. तथापि दोहोंहून अधिक महत्त्वाचा ऐतिहासिक ग्रंथ म्हणजे गुजराथचा इतिहास. याचीं सुमारें चारशें पानें आहेत. या ग्रंथास इंग्रजी इतकाच गुजराथी ग्रंथांचा आधार घेतला असल्यामुळें अनायासेंच गुजराथींतील ज्ञानकणही महाराष्ट्रीयांस चाखावयास मिळतात. या ग्रंथाचा आणखी एक विशेष म्हणजे याच्याशेवटीं लोकहितवादींनीं एक देशी संस्थान व ब्रिटिश हिंदुस्तान यांची कलमवारीनें तुलना केली आहे. यांतील उद्देश उघड आहे. तो म्हणजे आत्मनिरीक्षण. अशा निकोप आत्मनिरीक्षणाच्या दृष्टीमुळेंच त्यांच्या ऐतिहासिक ग्रंथाचें महत्त्व केवळ शालोपयोगी इतिहासाहून अधिक आहे. आणखी एक महत्त्वाचा ऐतिहासिक ग्रंथ म्हणजे "पृथ्वीराज चव्हाण.", या ग्रंथाचें समग्र नांव "दिल्लीचे शेवटचे क्षत्रिय महाराज पृथ्वीराज चव्हाण यांचा इतिहास" असें आहे. हा ग्रंथ लोकहितवादींनीं विख्यात चारणकवि चांद वरदाई यांच्या "पृथ्वीराज रासा" नांवाच्या चारण भाषेंतील प्रसिद्ध काव्याचें आधारें लिहिला आहे. तथापि मूळ चारण काव्याचा प्रत्यक्ष उपयोग केलेला नसून या काव्याच्या द्विवेदीकृत सारांशावरून प्रस्तुत मराठी इतिहास त्यांनीं लिहिला. याच्या आतांपर्यंत तीनचार आवृत्त्या निघाल्या आहेत. यावरून याची लोकप्रियता सहजच दिसून येईल. या ग्रंथासही राष्ट्रीय दृष्टीनें लिहिलेली प्रस्तावना आहेच. आणि तिची योग्यता अर्थातच स्वतंत्र आहे.

लोकहितवादींच्या ग्रंथाचें परिशीलन करणारास दिसून येणारी पहिली गोष्ट म्हणजे त्यांची संशोधक बुद्धि व विद्वत्ता. तथापि या दोन्ही शब्दांवरून साधारणतः प्रतीत होणाऱ्या गुणांहून त्यांच्या अंगीं दिसून येणारे गुण थोड्या वेगळ्या स्वरूपाचे आहेत. सर्वसाधारण विद्वानांत विद्वत्तेचें पर्यवसान लोकसेवेंत झालेलें दिसतें. परंतु लोकहितवादींचे ठिकाणीं प्रथम लोकहितेच्छा व तदनुषंगानें वाचन, संशोधन, लेखन अथवा इतर कोणताही उद्योग अशी स्थिती होती. यामुळें त्यांच्या प्रचंड ज्ञानसंग्रहास व ग्रंथसंभारास एक विशिष्ट ध्येयात्मक वळण असल्याचें सर्वत्र प्रत्ययास येतें. पांडित्यवर्धनाकरितां वाचन आणि पांडित्यप्रदर्शनार्थ लेखन अशी स्थिती त्यांचे वाङ्मयांत कोठेंच दिसत नाहीं. विद्वान् हा शब्द फार मोघम अर्थानें वापरला जात असल्यामुळें मेकॉले, ॲडिसन् सारख्यांचें चुरचुरीत वाङ्मय वाचून पदवी मिळविणारा व वेद, पुराणें या सारख्या ग्रंथांचा प्रत्यक्ष परिचय करून घेणारा हे दोघेही एकाच माळेंत ओढले जाण्याचा संभव असतो ! तथापि लोकहितवादी यांची विद्वत्ता दुसऱ्या प्रकारांत मोडणारी म्हणजे अत्यंत उच्च दर्जाची होती, हें त्यांचे ग्रंथ वाचणारास जागजागीं पटल्यावांचून रहात नाहीं. वेद, उपनिषिदें, महाभारत, भागवत, भगवद्गीता, फारशी व अरबी ग्रंथ, महाराष्ट्रीय सताचे ग्रंथ, अनेक तंत्रग्रंथ, स्मृतिग्रंथ, पुराणें, ऐतिहासिक कागद व सनदा, वगैरे—ज्यास प्राचीन समाजाचीं अस्सल प्रतिबिंबें व अखिल विद्येचा पाया म्हणतां येईल अशा—ग्रंथाचे उल्लेख त्यांच्या लिखाणांत पदोपदीं आढळतात.

वरील गोष्टीचा प्रत्यय त्यांच्या '**स्वाध्याय**' या ग्रंथात इतर ग्रंथाहून अधिक येतो. त्यांच्या सूक्ष्म संशोधक बुद्धीचा नमुना पाहावयाचा असल्यास पुढील उद्गार पाहावें. "एका संहितेंत जें वाक्य आहे तेंच दुसरे ठिकाणीं 'ब्राह्मणांत' आढळतें; किंवा संहितेंतील मंत्र दुसऱ्या ठिकाणीं पाठभेदानें येतात" .... "ऋक्संहितेंत यज्ञाचा अनुक्रम धरला नाहीं ... सूत्रांत जे मंत्र घेतले आहेत तेवढ्यांची वेगळीच पोथी लिहितात व तीस मंत्र संहिता म्हणतात. यावरून यज्ञाचा क्रम स्थापन झाला. त्यापूर्वीं ऋग्वेदसंहिता उत्पन्न झाली असावी असो

कल्पना होते" "...ब्राह्मण कशास म्हणावें व मंत्र कशास म्हणावें?—तर मंत्र हे निरपेक्ष वचन आहेत; परंतु मंत्राची अपेक्षा ब्राह्मणांस आहे."

"पुढें ऋग्विधानादिक ग्रंथ व प्रयोगाचे ग्रंथ जे महानिबंधकारांनीं केले, त्यांत तर याहूनही अधिक विनियोग, म्हणजे पूजेंत पंचामृताचे मंत्र, धूपाचे मंत्र, पंचगव्याचे मंत्र या प्रकारचे झाले आहेत. ज्याचे आरंभीं 'द' हें अक्षर आले तो दह्याचा मंत्र होतो. मग तो अर्थानें जरी न झाला तरी लिंगानें झाला असें मानतात."... "पुढें वैदिकांचें व तांत्रिकांचें ऐक्य होऊन ते परस्परांस मान्यहि करूं लागले व प्रयोगकारांनीं वैदिक कर्मे लिहून त्यांत तांत्रिक कर्मेंहि लिहून ठेविलीं. ह्याचें उदाहरण संध्येंत पाहिलें तर आसन-विधि, मुद्रा, अर्घ्य हीं सर्व तंत्रांतून घेतलीं आहेत....परंतु या गोष्टी वेदांस अश्रुत आहेत."... "संस्कृतांत मूळ शब्दास प्रतिपादिक म्हणतात आणि त्यास '**सुप्तिङन्त**' प्रत्यय लागला म्हणजे पद होतें. उदाहरण, 'राम' हें प्रातिपादिक; याचें पद रामः असें झालें...संहिता या '**पदप्रकृति**' आहेत"... "वेदाच्या पारायणाचे अनेक प्रकार आहेत. घन (पारायण):— यांत '**शिखा**' पुढें '**विपर्यास**' आणि नंतर '**क्रम**'—यज्ञेन यज्ञं, यज्ञं यज्ञेन, यज्ञेनज्ञमयजंता...देवा अयजंत यज्ञं, यज्ञमयजंत देवाः ॥ यांत तीन तीन चार चार पदांचे घन म्हणावें तेव्हां एक एक पद तेरा वेळा येतें. ही पारायणाची पद्धत काढणारे दोन ऋषी होते. एकाचें नांव **व्याली** व दुसऱ्याचें **हयग्रीव**"

वरील वचनसंग्रहावरून लोकहितवादींचे वैदिक वाङ्मयाचें सूक्ष्म परि-शीलन व सिद्धान्त अत्यंत बालबोध भाषेंत मांडण्याची पद्धति यांची कल्पना त्यांचे समग्र ग्रंथ न पाहणारांसही येईल. त्यांचा उद्योग व स्वतंत्र-बुद्धि यांचें महत्त्व ध्यानीं येण्यास त्यांचे काळीं तज्ज्ञांनीं आयते तयार केलेल्या सुलभसंदर्भग्रंथांचा अभाव होता हीही गोष्ट लक्षांत धरली पाहिजे. त्यांचा काळ व त्यांचा असामान्य ज्ञानसंग्रह लक्षांत घेतल्यास त्यांस संस्कृतचा गंधही नव्हता असें म्हणणारास अज्ञानी म्हणावें कीं बेजबाबदार म्हणावें हेंच समजत नाहीं! आणि अशी हास्यास्पद विधानें विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचे सारख्या लोकमान्य लेखकानें केलीं असें पाहिलें म्हणजे वादप्रसंग साजरा

करण्याच्या भरीस पडून मोठमोठे लेखकही चिरकाल हास्यास्पदतेस कसे पात्र होतात त्याबद्दल आश्चर्ययुक्त विषाद वाटल्यावांचून रहात नाहीं. लोकहित-वादींच्या संस्कृत ज्ञानाविषयीं चिपळूणकर लिहितात, येथील गटारयंत्रावरील भटजींनीं भांग्या मारुतीचें वरप्रदान घेऊन इंग्रजी विद्येविषयीं व्याख्यानें देण्याचा सपाटा चालवून रसायनशास्त्र...दर्शनानुशासन यावर जर गर्दी उडवली, तर ते जितपत हास्यस्पद होईल तितपतच रावबहादुरांचें प्रस्तुत प्रकरणीं पांडित्य होय."...."आम्हांस कबूल आहे कीं त्यांनीं स्वतः जरी "रामः रामौ" "घटः पटः" केलें नाहीं तरी कांहीं चिंता नाहीं पण हे तरी अवश्य आहे कीं नाहीं कीं ज्यास जास्त वरील विद्या अवगत आहे त्यांच्या-पासून त्यांनीं प्रस्तुत प्रकरणीं कांहीं तरी माहिती करून घ्यावी!" तसेंच एके ठिकाणीं उघड उघड मुद्रणदोषाबद्दलहि लोकहितवादींच्या अज्ञाना-सच जबाबदार धरून त्यास 'नैय्याइक' हा शद्ब शुद्ध, कीं "नैय्याकई" हा शुद्ध एवढेंही समजत नव्हतें असें म्हणण्याचाही पोरकटपणा चिपळूणकरांनीं केला आहे!

विष्णुशास्त्री चिपळूणकर यांची भडक लिहिण्याकडे प्रवृत्ति होती ही गोष्ट ध्यानीं धरली तरीही वरील हास्यास्पद मुक्ताफळें त्यांच्या सारख्यांच्या लिखा-णांत कशीं शिरली याचा अचंबा वाटतो. पण लोकहितवादींच्या विद्वत्तेचें आकलन विष्णुशास्त्री यांस न होण्यास आणखी एक कारण संभवतें. विष्णु-शास्त्री व लोकहितवादी यांच्या अध्ययनाच्या विषयांत, पद्धतींत, कालांत, व हेतूंत महदंतर होतें. विष्णुशास्त्री यांजवर मेकॉलेसारख्या उच्छृंखल व उथळ गद्य लेखकांची व सुभाषितकार, मोरोपंत यांजसारख्या शद्बचमत्कृतींच्या नादीं लागलेल्या कवींची विशेष छाप होती. प्राचीन संस्कृत वाङ्मयासंबंधीं पाहावें तर भडक लिहिणें व हातचलाखी यांच्या मागें लागलेल्या त्यांच्या सारख्या लेखकास संस्कृतसंशोधन हें आपलें क्षेत्रच नव्हे असें वाटल्यास नवल नाहीं. या दृष्टीनें त्यांचे पुढील उद्गार मोठे मासलेवाईक आहेत! "पुरुषसूक्तांतील चातुवर्ण्योपपादक ऋचा सर्वप्रसिद्धच आहे. पण वरील सूत्र हें प्रक्षिप्त होय असें अर्वाचीन पंडितांचें म्हणणें पडतें. मग खरा प्रकार काय असेल तो असो!" बाकी लोकहितवादींच्या ज्ञानाचे बाबतींत

भरमसाट लिहिणाराच्या आंगचा हा प्रांजलपणा एका दृष्टीनें अभिनंदनीयच म्हटला पाहिजे! असाच प्रांजलपणा मूळ नाटक न वाचतां भाषांतरावर अभिप्राय दिल्याचें कबूल करतांना विष्णुशास्त्री यांनीं दुसऱ्या एके ठिकाणीं दाखविलेला आहे!

प्राचीन संस्कृत ग्रंथांप्रमाणें फारशी व अरबी ग्रंथांचेहि उल्लेख लोकहित-वादींचे ग्रंथांत आले आहेत. कुराण व त्यावरील अनेक टीका, मुसलमानांचे धार्मिक विधी यांची माहिती त्यांनीं आपल्या सुबोध निबंधांच्या द्वारें सामान्य लोकांस करून दिली आहे. 'गुलिस्तान' सारख्या चतुरालापांनीं भरलेल्या फारशी ग्रंथाचें भाषांतर करून इराणी संस्कृतीचा स्वजनास प्रत्यक्ष परिचय करून देण्याचा प्रथम प्रयत्नही याच आद्य साहित्यसेवकानें केला. या बाब-तींत मात्र अज्ञानाचा आरोप करण्याइतकीहि सामग्री विष्णुशास्त्री यांचे संग्रहीं नसल्यामुळें फारशीच्या अज्ञानाच्या आरोपांतून तरी बिचारे रावबहादुर वाचले म्हटलें पाहिजे!

लोकहितवादींच्या लिखाणांतील आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांची अनुकरणाक्षम भाषाशैली. लोकहितवादींच्या ग्रंथांचें वाचन आजमितीस फार थोड्यांकडून होत असले तरी त्यांची शतपत्रांतील भाषासरणी केवळ वैशि-ष्ट्यामुळें सर्वांच्या परिचयाची आहे. हृदयांतून निघून हृदयाचा ठाव घेणारी तोकडी निर्मेळ मराठी वाक्यें म्हणजे लोकहितवादींचीं, असें ओळखावें. तथापि त्यांची स्फुट निबंधांतील भाषा व मोठ्या प्रबंधाची भाषा यांत अंतर आहे. जिव्हाळा व निर्व्याजता मात्र सर्वत्र सारखींच आढळतात. त्याचप्रमाणें त्यांच्या लेखनपद्धतीसंबंधीं आणखीही एका गोष्टीचा आदरपूर्वक उल्लेख प्रत्येक टीकाकारास करावा लागेल. आणि ती गोष्ट म्हणजे त्यांनीं त्यांच्या प्रचंड लेखनापैकीं एक वाक्यहि केवळ शब्दगौरवाकरितां अथवा वादकंडू शमविण्याकरितां लिहिलेलें आढळत नाहीं. विष्णुशास्त्रींच्या भाषे-प्रमाणें लोकहितवादींची भाषा नखऱ्यानें वाचकांस दिपवीत नसली तरी जिव्हाळ्यामुळें अंकित करून सोडते. उदाहरणार्थ पुढील हृदयस्पर्शी उद्गार पहावे:—" अरे अरे! फुकट हे ब्राह्मण लोक गर्वानें जळतात. मागील

गोष्टी मनांत कशाला आणतात? मी तुम्हांस पुसतों कीं, जेव्हां तुम्ही आपले जांवयाचे मरणाची खबर ऐकतां आणि तुमची कन्या तर लहान, तिचें आणि जांवयाचें अद्यापि दर्शनहि झालें नाहीं; असें असतां त्या लहान अर्भक बालकाविषयीं तुम्ही आपलें मनांत निष्ठुरपणा कां आणता? आणि आपले कन्यांस तुमचे तुम्हीच खाटीक कां होतां बरें? अरे, परकी लोक यांनीं जर तुमच्या कन्या रस्त्यांतून जातांना पाहिल्या तर त्यांची अवस्था पाहून अन्तःकरण चरचर भाजतें आणि दया उत्पन्न होती...अहो लोकांनो, तुम्ही आपल्या कन्याचे वध करणारे आहांत!" ही भाषा लोकहितवादींनींच लिहावी! लोकहितवादी यांचे भाषेंत अनुकरण करण्यासारखें कांहीं नाहीं असें एका विद्यमान प्रसिद्ध लेखकानें म्हटलें आहे. तें कोणत्याहि अर्थानें म्हटलें असो. चिपळूणकर यांच्या भाषेप्रमाणें ती अनुकरणसुलभ नाहीं या अर्थानें मात्र ते उद्गार खरे आहेत. आणि ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे कीं चिपळूणकरांच्या भाषेचें अनुकरण करणारे अनेक निघाले, परंतु लोकहितवादींची भाषा एकासहि उचलता आली नाहीं. नखऱ्याची नक्कल उठवितां येईल परंतु आंतड्याची तळमळ मूळचीच लागते!

जिव्हाळ्यामुळें उद्बोधनाचें व सुलभतेमुळें ज्ञानदानाचें कार्य लोकहितवादींच्या गद्यग्रंथसंभारानें अत्यंत यशस्वितेनें केलें. मराठी भाषेला सर्वस्वी नवीन असें विषयही अगदीं व्यवहारांतील भाषेंत विशद करण्याची त्यांची हातोटी केवळ असामान्य होती. '**राज्यसुधारणा**' या पत्ररूप निबंधांत ते म्हणतात—"विलायतेंतील राजा जज्जाचे नाझराप्रमाणें जेव्हां लोकांची सभा म्हणजे '**पार्लिमेंट**' हे कायदे फर्मावितात तेव्हां राजा त्या बरहुकूम वहिवाट करतो."

तथापि ही घरगुती भाषाच सर्वत्र आढळते असें मात्र नव्हे. जीं पत्रें व निबंध निर्वाणीचे निरोप म्हणून लिहिली आहेत अथवा ज्या ऐतिहासिक गोष्टी केवळ चुटके म्हणून आहेत त्यांतच अशी भाषा आहे. विषयानुरूप अस्खलित वाक्प्रवाहाचे नमुनेहि थोडे आढळत नाहींत. उदाहरणार्थ पुढील वाक्यें विष्णुशास्त्रींचीं कीं लोकहितवादींचीं म्हणून विचारल्यास झटकन सांगण्याची

पंचाईतच पडेल !—" उदयास्त हे पदार्थमात्रास जसे लागलेले दिसतात तसे राष्ट्रस्थितीसही चिकटलेले आहेतच. व याला साक्षी जगाचा इतिहास हाच प्रत्यक्ष आहे. सूर्यनारायणाचा एकदा उदय झाला म्हणजे तो आकाशांत वर चढतां चढतां अगदीं मध्याह्नीला आपल्या पूर्ण वैभवानें युक्त असा तेजःपुंज आणि दैदीप्यमान गोल दिसतो; परंतु पुढें पुनः तोच तेजोराशि अस्ताचलाची वाट धरूं लागून शेवटीं सूक्ष्म वैभवयुक्त होऊन अस्तंगत होतो तीच गोष्ट राष्ट्रीय स्थितीची आहे."

लोकहितवादींच्या वाङ्मयविस्तारांतून त्यांची शिकवण म्हणून वेचून काढणें जितकें सोपें तितकेंच अवघड आहे. असें असतांहि वैतागाच्या भरांत त्यांनीं कित्येकदा काढलेले उद्गार संदर्भापासून विभक्त करून, हींच त्यांचीं मतें म्हणून उथळ टीकाकारांनीं लोकांपुढें टाकल्यामुळें त्यांच्या मतांचीं सर्व अंगें पाहणें अधिक आवश्यक होऊन बसतें. त्यांच्या मतांविषयीं आजच्या सर्वसामान्य महाराष्ट्रीयाचें मत म्हणजे " लोकहितवादी हे स्वकीयांचे त्यांतून ब्राह्मणांचे द्वेष्टे होते. व इंग्रजांचें तेवढें त्यास प्रिय होते." तथापि त्यांचे समग्र ग्रंथ—इतकेंच काय पण मुख्य ग्रंथांपैकीं कोणताहि ग्रंथ समग्र वाचल्यास हें मत कसें प्रसृत झालें याबद्दल सखेद आश्चर्य वाटल्याखेरीज राहात नाहीं. तथापि या मतांचा उगम शोधणें फारसें कठीण नाहीं. खुद्द लोकहितवादींचे ग्रंथ आज दुर्मिळ आणि त्यांच्या ग्रंथांची अत्यंत विपर्यस्त माहिती पुरविणारा चिपळूणकरांचा निबंध सर्वांच्या वाचनांत. तथापि यावरूनच लोकहितवादींच्या खऱ्या शिकवणीचा प्रसार होणें किती जरुर आहे हें दिसून येईल. शिवाजीमहाराजांसारखे पराक्रमी क्षत्रिय व रामशास्त्र्यासारखे निःस्पृह ब्राह्मण याविषयीं त्यांनीं ठिकठिकाणीं आदराचे उद्गार काढले आहेत. शिवाजी महाराजास तर त्यांनीं प्रभु रामचंद्र, भगवान् श्रीकृष्ण यांच्या मालिकेंत घातलें आहे. त्यांनीं ब्राह्मणावर टीकेचा मारा केला असेल; पण ' पेशवाईत रामशास्त्रीच काय तो ब्राम्हण होता ' या त्यांच्या उद्गारांत त्यांच्या ब्राम्हणांविषयींच्या मतांचें सार साठवलें आहे ! अशा पुरुषास ब्राम्हणद्वेष्टा ठरविणारे पर्यायानें अनाचाराची तरफदारी करून ब्राम्हणांचें अहितच करीत आहेत.! हिंदूंच्या क्षात्रतेजाविषयींचा त्यांचा अभिमान

त्यांच्या इतिहास–ग्रंथांच्या पानापानांत दिसून येतो. आणि स्वकीयांच्या बुद्धिवैभवाच्या बाबतींतील त्यांची समजूत ऐकून तर इंग्रजी ग्रंथांवरून देशाभिमान गिरवूं पाहणाऱ्या त्यांच्या नंतरच्या शद्बशूर पिढीस अचंबाच वाटला असता. कित्येक वर्षांच्या जबाबदारीच्या नोकरींतील अनुभवावरून त्यांचें असें मत बनलें होतें कीं, बुद्धिच्या बाबतींत, ब्राम्हण, प्रभू वगैरे हिंदूजाती युरोपियनांहून सरस आहेत ! एके ठिकाणीं त्यांनीं स्पष्ट म्हटलें आहे कीं एखादा गुंतागुंतीचा खटला युरोपियन अधिकाऱ्यास समजतां समजत नाहीं पण त्याच्या हातखालच्या हिंदू 'हपीसरांस' तो चटकन आकलन करतां येतो याचें कारण युरोपियनांचीं बुद्धि मद्यमांसामुळें जड झालेली असते.

अनाचाराची त्यांस मनस्वी चीड होती. आचार ( धार्मिक कर्मकांड ) व नीति यांचा फारकत करण्याविरूद्ध त्यांनीं पुनः पुनः लिहिलें आहे. व्यभिचारी स्त्री शिवलिंगावर वीस घागरी ओतते व उघड लांच खाणारा मनुष्य दोन तास नाक धरून बसतो, आणि हीं दोघेही लोकांत मोठी धर्मनिष्ठ ठरतात हें पाहून त्यांस भयंकर सात्त्विक संताप येई. "धर्म धर्म म्हणून सर्व ओरडतात पण धर्म म्हणजे काय ? म्हणून विचारलें, तर चाली म्हणजेच धर्म ! म्हणून सांगतात " याचेंहि त्यांस महदाश्चर्य वाटे ! म्हणूनच जागजागीं त्यांनीं भोंवतालच्या अज्ञानी व अनाचारी समाजाविषयीं आणि अज्ञानांतही वर्णगुरुत्वाचा अहंकार मिरवणाऱ्या ब्राम्हणांविषयीं कडक शब्द वापरले आहेत. त्यांचीं धार्मिक मतें नेमस्तच होतीं व त्यांनीं प्रतिपादलेल्या सुधारणाहि आत्यंतिक स्वरुपाच्या नव्हत्या. त्यांचा ईश्वरावरील भाव दृढ होता व तो जागजागीं दिसतो. विष्णुशास्त्री यांचे चरित्रकारांनीं वर्णिलेली त्यांची ईश्वरविषयक संशयबुद्धि व अश्रद्धा पाहिली असतां लोकहितवादीसारख्या श्रद्धावान व सदाचारी पुरुषांस अनाचाराबद्दल वाटलेल्या सात्विक संतापाचें रहस्य त्यांस समजणें कठीण होतें असें वाटल्यावांचून रहात नाहीं.

ते जातिभेदाच्या पूर्ण विरुद्ध असूनही तारतम्य सोडून मात्र कधींच लिहीत नसत. उलट त्यांनीं म्हटलें आहे कीं, जाती

मोडल्या तरी फिरून राहतीलच. पण असें आहे म्हणून पूर्वींचीं बंधनें प्रयत्नें करून कायम ठेवा अथवा वाढवा असें म्हणणारांचा मात्र त्यांनीं निषेध केला आहे. या बाबतींतील त्यांचे जागजागींचे उद्गार त्यांच्या व्यवहारपटुत्वास व तारतम्यास साजेसेच आहेत. ते म्हणतात, " कोणत्याहि जातींत मुलगी देण्यास हरकत ठेवली नाहीं तरी आजच ब्राम्हण व रामोशी यांच्या सोयरिकी खास होत नाहींत. मग प्रतिबंध उराशीं धरून मत्सर कां वाढवितां ? प्रतिबंध उगाळीत बसण्यामुळेंच महार इंग्रजांच्या पलटणींत अगत्य दाखल होतात ! "

स्वतःस पुराणमताभिमानी म्हणविणारे लोक, जें धार्मिक शैथिल्य उघड्या डोळ्यांनीं वाढवीत होते त्यावरही लोकहितवादींनीं कोरडे ओढले आहेत. ते म्हणतात " या पुण्यांत शंभर डोले होतात त्यापैकीं दहापांच मुसलमानांचे आणि बाकीचे, आमचे हिंदू बापाच्या श्राद्धाइतपत अगत्यपूर्वक करतात !" परदेशगमनाबद्दल बहिष्कार पुकारणारे पंडित या विपरीत आचाराच्या बाबतींत मात्र मुल्लांचे वंशज असल्याप्रमाणें वागतात. पण या विपरीत प्रकाराच्या मुळाशीं असलेली जनतेची मनोवृत्ति मात्र त्यांनीं आपली नेहमीची तीव्र संशोधक बुद्धि चालवून अचूक ताडली आहे. ते म्हणतात, " ख्रिस्ती लोक जर उद्यां ख्रिस्ताचे ताबूद करतील तर आज बाप्त्यांच्या नांवानें बोटे मोडणारे व मिशनऱ्यांविरुद्ध शिवराळ निबंध खरडणारे आणि त्यांचे अर्धवट शिकलेले वाचक त्या ख्रिस्ती ताबूदांपुढें देखील भक्तिभावानें ऊद जाळतील !" अशा बाबतींत ब्राह्मण मूग गिळून कां, याचें रहस्य लोकहितवादींनीं अचूक दाखवून दिलें आहे. जोपर्यंत ब्राह्मण निःस्पृह होते तोपर्यंत त्यांनीं निःस्पृहपणे दंडक घालून दिले. पण पुढें पोटार्थी बनतांच—"काशी क्षेत्रींच्या ब्राह्मणास वाटा मिळतांच अमृतरावाचा लुटीचा पैसा पवित्र ठरूं लागला !" व अशा रीतीनें " एकदा वेडेपणाचें पीक माजलें म्हणजे तें विचारवंतांचेंही कांहीं चालूं न देतां उलट त्या वेडेपणांतच विचारवंत प्रवेश करून त्यांस उत्तेजन देतात असें दिसतें "

( उदेपूरचा इतिहास )

तसेंच देवालयांत कसबिणींचें वास्तव्य व सुवासिनींहूनहि त्यांचें तेथील माहात्म्य यांचाहि त्यांनीं तीव्रनिषेध केला आहे. पुण्यांतील देवास मिळालेलीं 'खुन्या' 'छिनाल' वगैरे टोपणनांवें पाहूनहि त्यास परम आश्चर्य व खेद वाटे. अशा गोष्टींना वैतागून ते अखेर म्हणतात, "**हे सर्व सुधारण्यास ईश्वर कोण शंकराचार्य धाडील तो खरा !**"

त्यांच्या जुन्या चालीवरील टीकेच्या बुडाशीं केवळ इंग्रजी ग्रंथांचें अवलोकन व इंग्रजांचें अनुकरण हीं नव्हतीं. त्यांच्या टीकेचा पाया भक्कम निर्दोष होता. ते म्हणत, "—ज्या **चाली पराक्रमाचे आड येतील त्या सोडा.**" परदेश गमनाचे बाबतींत त्यांनीं लिहिलें आहे—"म्लेंछाचे देशास जाण्यास अटकाव होता. परंतु आतां तुमचाच देश म्लेंछाचा झाला. आतां अटकाव कुठून उरला ?"

त्यांचे उद्गार कित्येक ठिकाणीं कडक वाटतात पण या तीव्रतेच्या बुडाशीं स्वजनांची लाजिरवाणी स्थिति पाहून आलेला वैतागच होता. त्यांनीं आपल्या लेखनांतील त्वेष कोणाही समाजहितकर्त्याची फुकट वैयक्तिक टर करण्याच्या बाष्कळ कार्यांत योजिला नव्हता. "उद्योग–प्रशंसा" या निबंधांत ते लिहितात—"तसा (अमेरिकेसारखा) हा देश केवळ इंग्रजांचे वस्तीचा होईल काय ? ... अशा प्रकारचे प्रश्न माझे अन्तःकरणांत येतात व याची विवंचना करतां करतां ईश्वरइच्छा काय आहे ती समजत नाहीं ......... जे सुधारलेले लोक आहेत त्यांस मी पुसतों कीं, तुम्हांस जर सर्व सर्व गोष्टी पुढें भयंकर दिसतात तर तुम्ही स्वस्थ कसे बसलेत ?..." अशी तीव्र तळमळ उरांत बाळगून लोकजागृतीकरितां ज्या लोकहितकर्त्यानें आपलें अखिल आयुष्य वेचलें त्याच्या निंदेनें स्वलिखित नटविणारास अंध म्हणावें कीं, कृतघ्न म्हणावें हेंच समजत नाहीं !

असेंही क्वचित् भासविण्यांत येतें कीं, लोकहितवादींस कळकळ असली तरी युरोपियनांच्या कर्तबगारीनें ते दिपून गेले होते. व स्वजनांविषयीं त्यास कांहींच विश्वास वाटत नव्हता. त्यांचीं स्वजनांच्या पात्रतेविषयींचीं मतें आतांपर्यंत थोडी बहुत येऊन गेलींच आहेत. तथापि स्वदेशीयांच्या प्रत्यक्ष

राजकीय कर्तबगारीबद्दल अथवा भवितव्याबद्दलहि त्यांस त्यांच्या टीका-कारांहूनहि भरीव विश्वास होता. ते म्हणतात, "कित्येक मूर्ख, राज्य करणें काम यवनांचेंच म्हणूं लागले आहेत. पण त्यास आठशें वर्षांपूर्वीचें दिसत नाहीं."

याखेरीज आज सर्वमान्य ठरलेल्या राष्ट्रोद्धाराच्या मार्गाचाही त्यांनीं ठिकठिकाणीं कळवळ्यानें उपदेश केला आहे "हिंदू लोकांचा व्यापार" या निबंधांत ते म्हणतात "याजकरितां सर्वांनीं असा कट करावा कीं, जे आपले देशांत पिकेल तेंच नेसूं ... कापूस विकणारांनीं असा विचार करावा कीं, इंग्रजांस इकडे तयार केलेलीं कापडें द्यावीं परंतु कापूस देऊं नये...सांप्रत आपलेच लोक आपल्या लोकास मारीत आहेत. जशी बाहेरची चांगली स्त्री पाहून घरची लग्नाची स्त्री टाकून तिचे पाठीस लागतात आणि भुलतात तसें या लोकांचें झालें." पण या गोष्टी केवळ बुद्धिविलासास्तव ग्रंथांत निविष्ट करून समाधान होण्यासारखी त्यांची वृत्ति नव्हती. त्यांची तळमळ व या घसरत्या घरास सावरण्याची घाई त्यांच्या पुढील पिढ्यांत जहाल गणल्या गेलेल्या पुढाऱ्यांत तरी आढळली असती कीं नाहीं याची शंकाच आहे. याच निबंधांत ते पुढें म्हणतात, "जर हरदास आणि कथेकरी यांनीं अशीं मतें घेतलीं आणि लोकांस जर भरविलीं तर बहुत लोक एकत्र होतील...चांगल्या गोष्टी छापखान्यांतूनच निघाव्या असें नाहीं. हरदासांनींहि काढाव्या."

त्याचप्रमाणें इंग्रजी राज्यांतील पक्षपात व कर्तबगार व्यक्तींची कुचंबणा या दोन महादोषांवरहि त्यांनीं जागजागीं कडक टीका केली आहे आणि पेशवाईतील अनेक दोषांची त्यास जाणीव असूनहि या बाबतींत सुराज्यापेक्षां कसलेंही स्वराज्यच श्रेष्ठ असें मत दिलें आहे. ते म्हणतात. "देशांत प्रसिद्ध पावण्याचीं स्थळें असलीं पाहिजेत. विलायतेतील पार्लमेंट आहे तें तसेंच स्थळ आहे. सांप्रत या देशीं असें स्थळ नाहीं ही मोठी कमताई आहे. आतां कोणी म्हणतील पेशवाईतील फडाप्रमाणें आतां कोडतें आहेत. त्यांत वकीली करून प्रसिद्ध व्हावें. डॉक्टर...एन्जिनियर...कौन्सिलर व्हावें.

...त्यास हें सर्व खरें आहे. यास आम्ही वाईट म्हणत नाहीं. हीं सर्व ठिकाणें फार योग्य आहेत. परंतु त्यांत समावेश व प्रतिष्ठा फार होते असें आम्हांस वाटत नाहीं. यांजकरितां मोठी प्रतिष्ठा होईल, बहुतांचा गुण दिसून येईल असें साधन कांहींतरी अवश्य पाहिजे. त्याशिवाय उमेदवारांची तृप्ति होत नाहीं. लक्षावधि लोक आहेत हे हल्लीं उगीच चोरांसारखे बसले आहेत. यांनीं कोठें व कोणत्या कामांत प्रसिद्ध व्हावें?" कॉंग्रेसच्या व्यासपीठावरून चाळीस वर्षें चाललेल्या इंग्रजी आक्रोशाचा इतका घरगुती व बाळबोध तर्जुमा कदाचित् लोकमान्य टिळकांच्या व्याख्यानांतच सांपडला तर सांपडेल !

लोकहितवादींचें अथांग वाङ्मय डोळे उघडून वाचणारास त्यांचा संदेश वरीलप्रमाणें दिसून येईल. आणि त्यांच्यावरील मतांत व आजकालच्या सर्वमान्य पुढाऱ्यांच्या मतांत तफावत ती कोणती ? किंबहुना उपरिनिर्दिष्ट सामाजिक राजकीय मतांस मान्यता न देणारा सर्वमान्य ठरूं शकेल काय ? पण त्यांच्या ग्रंथांच्या शेंकडों पानांत भरलेलीं हीं ढळढळीत मतें बाजूला ठेवून विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं ब्राह्मण, नाना फडनवीस व संस्कृत विद्या यांजवर त्यांनीं केलेल्या टीकेबद्दलच फाजील कांगावा केला आहे. बुद्धापासून विवेकानंदांपर्यंत सर्वच धार्मिक क्रांतिकारकांस ब्राह्मणांवर, हत्यार उचलावें लागलें आहे. नाना फडणविसाचें मुत्सद्दीपण इंग्रजांच्या मानानें कोतें पडत आहे हें नानांच्या काळचे महादजी शिंद्यासारखे अथवा सखाराम-बापूसारखे मुत्सद्दीहि म्हणत. मग लोकहितवादींसारख्या बारीक नजरेच्या इतिहासाभ्यासकास तसें वाटल्यास नवल काय ? आणि संस्कृत विद्येची थोरवी निदान लोकहितवादींस तरी कोणी शिकवायास नको होती, हें स्वाध्याय, अश्वलायनगृह्यसूत्र वगैरे त्यांचे ग्रंथ वाचणारास सहज समजून येईल. त्याचा कटाक्ष बहुजनसमाजाच्या उपयुक्ततेच्या दृष्टीनें व अध्ययन पद्धतीच्या दृष्टीनें होता. आणि तसें पाहिल्यास ज्या जुन्या शिक्षण-पद्धतीवर लोकहितवादींनीं कडाका उडविला आहे त्या पद्धतीची इंग्रजी कॉलेजचे जागीं योजना होणें शास्त्रीबुवास तरी मान्य झालें असतें काय ? विष्णुशास्त्रींनीं गौण मुद्यावर अलंकारिक व्याख्यान करून वाचकांस चकविलें

आहे असें लोकहितवादींचा एकहि ग्रंथ समग्र वाचणाराचें मत झाल्यावांचून राहणार नाहीं.

पण विष्णुशास्त्रींच्या विकृत टीकेंत व दुष्ट आरोपांतच लोकहितवादींचें रूप पाहण्याचे दिवस सुदैवानें संपत आहेत. आणि जो या लोकहितकर्त्यांचें स्वरूप प्रत्यक्ष त्यांच्या वाङ्मयसागरांत पाहील त्यास लोकहितवादी ऊर्फ सरदार गोपाळ हरी देशमुख हे खानदानी घराण्यांतील संभावित गृहस्थ, इंग्रजी, संस्कृत, फारशी वगैरे वाङ्मयांचा गाढ अभ्यास केलेले बहुश्रुत विद्वान्, अत्यंत नेकीनें वागणारे अधिकारी, दूर दृष्टीनें विचार करणारे व सामाजिक व राजकीय विचाराग्रणी आणि महाव्यासंगी व सामर्थ्यवान् गद्यलेखक असेंच दिसतील. त्यांचीं मतें दिवसेंदिवस अधिक हितावह व दूरदर्शित्वाचीं ठरत आहेत व त्याबरोबर त्यांच्यावरील उथळ टीका तिरस्करणीय ठरत आहेत. त्यांचे ग्रंथ महाराष्ट्र सारस्वतास चिरकाल भूषण होतील. त्यांच्या इतकी विपुल, विविध, व विचारप्रवर्तक रचना ( डॉ. केतकर सोडल्यास ) दुसऱ्या कोणत्याही मराठी साहित्यसेवकाचे हातून झालेली नाहीं. त्यांनीं हातीं घेतलेल्या कित्येक विषयांवर त्यांच्या पश्चात् एक एकही ग्रंथ होणें दुर्घट झालेलें दिसून येतें. त्यांतील कांहीं विषयांस तर त्यांच्या खेरीज एकही व्यासंगी लाभला नाहीं. अशा असामान्य व्यासंगी व अष्टपैलू लेखकाचे ग्रंथ भाषेंत ज्ञानकोशाप्रमाणें चिरकाल ज्ञानवर्धक ठरतील यांत शंका नाहीं.

---

# टीकाकार केळकर



श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या बहुविध कामगिरीचें सिंहावलोकन करणारास वाङ्‌मयात्मक टीकेंत त्यांनीं केवढी भर घातली आहे, हें पाहून आश्चर्य वाटल्याखेरीज रहात नाहीं. वास्तविक पाहतां ज्या होतकरू वकिलाचे ठायीं लो. टिळकांस आपला भावी राजकीय मदतनीस दिसला त्यानें आजमितीस विदग्ध वाङ्‌मय व टीकात्मक वाङ्‌मय यांत एवढी भर टाकावी हें मोठें विलक्षण वाटतें. एकादा वाङ्‌मयभक्त स्वार्थीपणानें असेंही मनांत आणील कीं, एवढें वाङ्‌मयात्मक बुद्धिवैभव सर्वस्वी वाङ्‌मय-सेवेला लाभतें तर--! कायद्याच्या कचाटयांत न सापडतां नोकरशाहीच्या कृत्यांवर साप्ताहिक भाष्य लिहिण्यांत गेलेला वेळ व गतकालांतील थोर व्यक्तींचें अंतरंग रंगभूमीवर चिरस्थायी करण्यांत घालविलेला वेळ या दोहोंतून कोणता वेळ अधिक सार्थकीं लागला असें खुद्द तात्यासाहेबांस विचारलें तरी ते देखील चिरस्थायी वाङ्‌मय-कार्याचीच किंमत अधिक करतील. द्रव्याचा स्थूल त्याग लोकांना चटकन दिसतो; परंतु, प्रियव्यवसाय बाजूला ठेवून प्राप्त कर्तव्य अंगिकारण्यांत घडलेला सूक्ष्म त्याग फार थोडयांच्या ध्यानीं येतो. केळकरांच्या वाङ्‌मयकार्याच्या एकाद्या अंगाचाहि विचार करणारांस या प्रकारच्या त्यांच्या त्यागाचें महत्व पटल्यावांचून राहात नाहीं.

पण ' काय झालें असतें ' या संबंधींची ही हळहळ म्हणजे एक उच्च प्रकारचा अधाशीपणाच होय. कारण टीका वाङ्‌मयासारखें वाङ्‌मयाचें एक

प्रधान अंग घेतल्यास, सर्वस्वी वाङ्मयाला वाहून घेणाऱ्या मनुष्याचे हातूनही एवढी महत्वाची कामगिरी क्वचितच झाल्याचें दिसून येईल.

केळकरांच्या टीका–वाङ्मयाचे तीन उगम स्पष्ट दिसून येतात. एक उगम म्हणजे साहित्यसम्मेलन व तत्सदृश वाङ्मयपरिषदांच्या प्रसंगीं केलेलीं चर्चात्मक भाषणें. दुसरा उगम म्हणजे गेल्या पंचवीस वर्षांत प्रसिद्ध झालेल्या अनेक ग्रंथांस त्यांनीं लिहिलेल्या प्रस्तावना. तिसरा म्हणजे संपादक व लेखक (Contributor) या नात्यानें त्यांनीं लिहिलेलें परीक्षणात्मक लेख. या खेरीज या प्रकारांत न मोडणारें त्यांचें 'सुभाषित व विनोद' हें पुस्तक स्वतंत्र वाङ्मयचर्चेचें मानतां येईल. यांत येऊन गेलेल्या त्यांच्या मतांचे दोन प्रमुख भाग पडतात. एक वाङ्मयानंदाची तात्विक चर्चा व दुसरा म्हणजे विशिष्ट वाङ्मयकृतींचें गुणनिदर्शन. पैकीं पहिला भाग अधिक महत्वाचा असला तरी दुसऱ्या भागाशींच सामान्य वाचकांचा अधिक निकटचा संबंध पोहोंचतो. केळकरांच्या सविकल्प समाधीच्या गूढांत शिरण्याचा प्रयत्न करणारांहून, त्यांच्या प्रस्तावनारूपी विद्युद्दीपाच्या प्रकाशांत ज्ञात अथवा अज्ञात लेखकांची चमक पहाणारांची संख्या केव्हांहि अधिक असणार.

'श्रीयुत न. चिं. केळकर यांचे प्रस्तावनेसह' या शब्दांची ग्रंथकार व वाचक या उभयतांवर एवढी मोहनी कां असावी याचा विचार करूं लागल्यास, सहानुभूतिसंपन्न व रसिक टीकाकार वाङ्मयाचे केवढें कार्य करीत असतो याची प्रतीति आल्याखेरीज राहात नाहीं. श्रीयुत केळकर यांच्यासारख्या विख्यात लेखकाच्या प्रस्तावनालेखांत न्यायनिष्ठुरतेपेक्षां सौजन्याचाच भाग अधिक आढळल्यास फारसें अस्वाभाविक नाहीं. तरी केवळ ग्रंथकाराच्या अथवा प्रकाशकाच्या आग्रहामुळें लिहिलेल्या प्रस्तावनांतहि श्री. केळकर यांचे हातून वाङ्मयचर्चेच्या तत्त्वाचा भंग झाल्याचें मात्र आढळणार नाहीं.

प्रस्तावनालेखक या नात्यानें लिहिलेल्या टीकालेखांहून भिन्न गुण संपादकीय टीकांत दिसून येणें अगदींच साहजिक आहे. त्यांतून "कुलकर्णी लीलामृत" अथवा चिरोल यांच्या "Indian Unrest" सारख्या पुस्तकांवर भडीमार उडविणारे केळकर व सहृदयतेनें प्रस्तावना

लिहून सामान्य पुस्तकाचाहि पुरस्कार करणारे केळकर यांत केवढी तफावत दिसते ! तथापि हीं दोन्ही टोकें सोडून केवळ निःस्पृह, पण नव–गुण–ग्रहणाचे बाबतींत कुशाग्र, टीकाकार या नात्यानें लिहिलेलीं परीक्षणें पहावयाचीं असल्यास श्री. खाडिलकर यांच्या " बायकांचे बंडावर " व प्रो. माधवराव पटवर्धन यांच्या " छंदोरचना " या पुस्तकावर लिहिलेलीं परीक्षणें पहावीं

पण, श्रीयुत केळकर हे केवळ वर्तमानपत्रीं परीक्षणलेखक अथवा भिडस्त प्रस्तावनालेखक नाहींत. टीकाकार या दृष्टीनें त्यांची महत्त्वाची कामगिरी याहून वेगळयाच प्रकारची आहे. टीकाकार हा वाङ्मयांतील सौंदर्य–समीक्षक ( Connoisseur ) अथवा दर्दी असतो. व एखादी गोष्ट सुंदर नाहीं असें म्हणतांच " सौंदर्य म्हणजे काय ?" हें सांगण्याची जबाबदारी त्याचेवर येऊन पडते. या दृष्टीनें त्यांनीं बडोदें येथील संमेलनांतील भाषणांत केलेल्या वाङ्मयानंदाच्या मीमांसेचें महत्त्व फार मोठें आहे. किंबहुना या भाषणानें त्यांस महाराष्ट्रीय टीकाकारांत अग्रस्थान मिळालें. कोणत्याही कलाकृतीपासून आनंदाची प्राप्ती कां व्हावी हा फार प्राचीन काळापासून चर्चेचा विषय होऊन बसला आहे. किंबहुना प्रस्थानत्रयीवर भाष्य लिहिणें हें जसें धार्मिक आचार्यत्वाचें लक्षण तसेंच काव्यानंदाची उपपत्ति लावणें हें वाङ्मयांतील आचार्यपदाचें चिन्ह आहे. या प्रश्नाचें वेड केवळ काव्य–भक्तांसच असतें असें नव्हे, तर केवळ तत्त्वचिंतनांत मग्न असणाऱ्या विरक्तांनींहि या प्रश्नाच्या विचारांत तपेंच्यातपें घालविलीं आहेत. या वाङ्मयीन मूल तत्त्वावर श्री. केळकर यांनीं पाडलेला प्रकाश पाहिल्यास टीकाकार या नात्यानें त्यांची योग्यता आजच्या प्रमाणेंच भावी पिढ्यांसही पटेल.

रसास्वादाच्या आनंदाची मीमांसा करतांना त्यांनीं असें दाखविलें आहे कीं, प्रत्यक्ष दुःख काव्य होऊं शकत नसलें तरी काव्यांत चित्रित केलेल्या ( उदाः–शाकुंतलाच्या चौथ्या अंकांतील ) दुःख मात्र आनंददायक होऊं शकतें याचें कारण वाचक आपली भूमिका न सोडतां प्रतिभेच्या सहाय्यानें दुसऱ्या भूमिकेचा अनुभव घेतो. हा तादात्म्याचा आनंद उत्कट असेल तर त्यास समाधि म्हणण्यास हरकत नाहीं. पण या समाधींत अथवा

तल्लीनतेंतही ज्ञाता ( Subject ) व ज्ञेय ( Object ) हीं पूर्णत: एक होत नाहींत म्हणून या स्थितीस श्री. केळकरांनीं "सविकल्प समाधी" ही सांप्रत सुप्रसिद्ध झालेली संज्ञा योजिली आहे. श्री. केळकर यांची ही मीमांसा जितकी सशास्त्र तितकीच रम्यही आहे. तथापि ही वाङ्मयमीमांसा आहे हें मात्र ध्यानांत ठेवलें पाहिजे. नाहींतर ती अपुरी वाटल्याखेरीज रहात नाहीं. मानसशास्त्राच्या किंवा तत्वज्ञानाच्या दृष्टीनें पाहिल्यास दुसऱ्याचें दुःख अथवा चित्रित दुःख तरी एकदम मूळ प्रकृति सोडून सुखोत्पादक कसें होतें ? शिवाय स्वत:ची भूमिका विसरण्यांत आनंद कां व्हावा ? वगैरे प्रश्न उरतातच. व या दृष्टीनें पाहिल्यास ॲरिस्टॉटल या प्राचीन तत्वज्ञानें व शोपेनहॉर या अर्वाचीन तत्वज्ञानें याच गूढाची जी उपपत्ति बसविली आहे ती अधिक मूलगामी वाटेल. तथापि, तात्यासाहेबांनीं अशी चर्चा केली असती तर ती रसिकांपुढें न वाचतां तार्किकांपुढें वाचावी लागली असती.

आणखी एका महत्वाच्या वाङ्मयीन प्रकारावर श्री. केळकर यांनीं वेळोवेळीं मननीय विचार प्रदर्शित केले आहेत. व तो प्रकार म्हणजे गूढ—गुंजनाचा. या प्रकाराच्या इष्टानिष्टतेचा अंगुलिनिर्देश त्यांनीं रे. टिळक यांच्या काव्यसंग्रहास लिहिलेल्या प्रस्तावनेंत केला आहे. तो केवळ अंगुलिनिर्देशच असला तरी त्यावरूनही श्री. केळकर यांस हा प्रकार फारसा आवडत नाहीं असें स्पष्ट दिसून येईल. "बाह्य सृष्टीचा पूर्ण परिचय व परामर्ष घेऊन झाला म्हणजे मग कवि—मन अन्तर्मुख झालें तर तें शोभतें. एरवीं तो प्रकार मुलाची सोडमुंज झाल्याबरोबर त्याला संन्यास देऊन भगवीं वस्त्रें नेसविल्यासारखा हास्यास्पद वाटतो." या प्रस्तावनेनंतर तेरा वर्षांनीं कविवर्य तांबे यांच्या कवितेच्या दुसऱ्या भागास लिहिलेल्या प्रस्तावनेंत ते लिहितात, "पण या शून्य संशोधनांतही गूढ अशा गोष्टी कवीला खरोखरच कांहीं दिसतात कीं नाहीं किंवा शून्य संशोधनाचा बहाणा करून कवी उगीच कांहीं वायफळ बडबड करीत आहे कीं काय हें चाणाक्षवाचकाला तेव्हांच उमगतें." या दोन्ही उद्गारांवरून श्री. केळकर यांचा रोष अतींद्रिय आनंदाचें वर्णन करतांना शब्द अपुरे पडल्यामुळें निरुपाय होऊन उत्पन्न

झालेल्या गूढगुंजनावर नसून अतींद्रिय अनुभवाचें ढोंग करणारावर आहे हें उघडच आहे. व कित्येक अर्वाचीन कवींचा अकारण उन्माद पाहिल्यास या रसिकवर्याचा हा रोष सकारण नाहीं असें कोण म्हणेल ? तथापि, इराणांतील सूफी पंथीय अथवा हिंदुस्तानांतील भक्तिमार्गी कवींनीं लिहिलेल्या कित्येक गीतांत जें अनुपम गूढ–गुंजन आढळतें, त्यांस श्री. केळकर यांजसारखे रसिक उच्चतम काव्यांत गणल्याखेरीज राहणार नाहींत हें उघड आहे.

याखेरीज आणखी एका वाङ्मयप्रकारावरील श्री. केळकर यांचे विचार अत्यंत मननीय आहेत. व तो प्रकार म्हणजे विनोद. विनोदावरील त्यांचे विचार दोन दृष्टींनीं मननीय आहेत. एकतर या सूक्ष्म भावाची त्यांनीं आपल्या " सुभाषित व विनोद " या पुस्तकांत सुंदर मीमांसा केली आहे. व दुसरें म्हणजे तें स्वतः अत्यंत उच्च प्रकारच्या विनोदाचें अधिष्ठान आहेत. किंबहुना सभ्यता, मार्मिकता व हास्योत्पादकता यांचें आदर्शभूत रसायन म्हणजेच श्री. तात्यासाहेब केळकर यांचा विनोद !

अगदीं अलीकडे श्री. केळकर यांनीं अश्लीलता या साहित्यदोषावर झालेल्या चर्चेत भाग घेऊन महत्वाचे साहित्यविषयक विचार प्रकट केले आहेत. तथापि, गुणांच्या चर्चेचा सर्वांत परिणामकारक मार्ग म्हणजे ते कृतींत दाखविणें आणि दोषाच्या चर्चेचा सर्वोत्तम मार्ग म्हणजे त्यांचा स्वकृतीस संपर्क न होऊं देणें ! या दृष्टीनें पाहतां हास्यतरंगावरून वाहतांनाही शिष्टतेचा किनारा न सोडणारें केळकरवाङ्मय म्हणजे ग्राम्य व बाजारी अश्लीलतेचा मूर्तिमंत निषेधच होय. व म्हणून त्यांच्या विस्तृत व सशास्त्र चर्चा न वाचतांहि त्यांचे या बाबतींतील विचार सहज समजण्यासारखे आहेत.

सारांश, क्वचित् उदाहरणानें तर क्वचित् नियमनानें श्री. केळकर यांनीं स्वतःच्या पिढींतील विविध वाङ्मयप्रकारास इष्ट वळण लावण्याची जी बहुमोल कामगिरी केली आहे तीमुळें त्यांस महाराष्ट्रीय टीकाकारांत आद्यस्थान देणें योग्य आहे. समतोलपणा व सहानुभूति हे टीकाकारास अवश्य असे गुण त्यांचे ठिकाणीं इतक्या उत्कटत्वानें वास्तव्य करीत आहेत कीं, त्यांच्या पायीं अन्य क्षेत्रांत त्यास अगतिकत्वाचा अथवा नेमस्तपणाचा आरोपही सहन

करावा लागला आहे ! पण वाङ्मयभक्त तरी या बाबतींत त्यांच्या ऐवजीं त्या क्षेत्रांसच दोषी ठरवतील. जेथें असे अमोलिक बौद्धिक गुण दोषवत् भासतात त्या राजकारणी धक्काबुक्कींतच कांहीं तरी हिणकसपणा असला पाहिजे. उच्चतर गुणांचा उपयोग राजकारणांत असतो कीं वाङ्मयांत असतो हें ठरविण्याचें हें स्थळ नव्हे. तरी एवढें मात्र खास कीं, श्री. केळकर यांचेबद्दल भावी इतिहासकार "वाङ्मयांत पडलेला मुत्सद्दी" (A politician in literature) असें मत देण्याऐवजीं "A critic in politics" 'राजकारणांत पडलेला टीकाकार' असें मत देण्याचाच अधिक संभव आहे.

# कै. गडकरी यांची लोकप्रियता

श्री व सरस्वती यांचे प्रमाणेंच योग्यता व लोकप्रियता यांचेंही साहचर्य-निदान समकालीनांच्या बाबतींत तरी क्वचित्च आढळतें. व त्यामुळेंच कित्येक तर वैतागानें, खरी योग्यता व लोकप्रियता यांचें व्यस्तप्रमाण आहे, असेंच समजतात; तर कित्येक यशोधनाचा वारसा स्वतःच्या मरणानंतरच मिळावयाचा असें धरून चालतात. एक प्रसिद्ध विद्यमान कवि विचारतात,—

कीर्तीचा स्वर्ग कोणाला ।
रे मेल्याविण लाभला ? ॥

तथापि योग्यता व लोकप्रियता यांचें समप्रमाण ठरविणें जितकें चूक तितकेंच व्यस्त-प्रमाण ठरविणेंही चूकच होय. शेलीसारख्या कविश्रेष्ठाला त्याच्या हयातींत कोणी विचारलें नाहीं; पण त्याच्याच समकालीन बायरननें आपल्या गुणाचा मोबदला जिवंतपणींच पुरेपूर घेतला. योग्यता व लोक-प्रियता यांचा हा दुर्लभ मधुर संगम अर्वाचीन लेखकांत गडकरी यांचे ठिकाणीं आढळतो. तथापि या बाबतींत आणखीही एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे व ती ही कीं कित्येकदां लोक-प्रियता लाभूनही खरें गुणग्रहण लाभलेलें नसतें. व या दृष्टीनें कै. गडकरी यांच्या खऱ्या गुणग्रहणास अद्यापि जागा आहे असें म्हणतां येईल.

कै. गडकरी यांची लोकप्रियता, काव्य, नाटक व विनोद या तीन क्षेत्रां-वर अधिष्ठित आहे. तथापि, या तीनही क्षेत्रांतील त्यांच्या लोकप्रियतेंत अद्याप कित्येक लोकभ्रम वावरतांना आढळतात. वस्तुतः लोकप्रियते प्रमा-

णेंच टीका—ग्रंथांचीही गडकरी यांचे बाबतींत उणीव नाहीं. विद्वानांनीं वेळोवेळीं लिहिलेल्या लेखांखेरीज दोन विस्तृत चर्चात्मक पुस्तकेंही जनते-समोर आहेत. व त्यांच्या एका प्रसिद्ध गुरुबंधूच्या लेखणींतून महाराष्ट्रास आणखीही एका अधिकृत टीकाग्रंथाचा लाभ होत आहे. तरीही " जुन्या समजुती मरतां मरत नाहींत " या अर्थाच्या इंग्रजी म्हणीचा अनुभव गडकरी यांचें बाबतींत आणखी कांहीं वर्षें तरी येत राहाणार यांत शंका नाहीं; उदाहरणार्थ, काव्याचीच गोष्ट घ्या. टीकाकारांनीं कांहींहि म्हटलें तरी सामान्य वाचकाच्या मनावरील ' राजहंस माझा निजला ' अथवा " गुलाबी कोडें " या कवितांची पकड नाहींशी झालेली नाहीं. उलट ' शेवटचें प्रेमगीत ' या सारख्या सुंदर कवितेस तितकीशी लोकप्रियता लाभलेली आढळत नाहीं. अशा विसंगतींचीं कारणें कित्येकदां आकस्मिकही असूं शकतात. एखादें मूल जन्मतःच पायगुणी ठरतें, त्याप्रमाणें एखादी कविता जन्मतःच कवियशाच्या दृष्टीनें पायगुणी ठरते व नंतर ती टीकाकारांच्या शास्त्रीय दृष्टीलाही फारशी जुमानीत नाहीं ! कवि यशवंत यांनीं ' आई ' या कविते-हूंन कित्येक चांगल्या कविता लिहिल्या आहेत. तथापि भाविक श्रोते कोणत्याही काव्यगायनप्रसंगीं आईची वाट किती आतुरतेनें पहात असतात. हें प्रसिद्धच आहे. तीच स्थिति गडकऱ्यांच्या " राजहंसा "ची झाली असावी.

नाटककार या दृष्टीनें गडकरी यांचे अंगीं उच्च गुण वसत होते, हें त्यांच्या अद्यापही नवीन वाटणाऱ्या " एकच प्यालयानें " सिद्ध केलेंच आहे. तथापि, गडकऱ्यांच्या सामान्य अनुयायांत, त्यांच्या झगझगीत श्लेषानुप्रासां-चीच अधिक चहा आढळते ! " एकच प्याल्या " तील प्रसंगोचित, व मर्मभेदक विनोदाऐवजीं " पुण्यप्रभाव व प्रेमसंन्यास " यांतील कोट्यांची लक्ष्यहीन तिरन्दाजीच त्यांच्या असंख्य अनुयायांस अधिक परवडते. गडक-ऱ्यांनीं निर्मिलेल्या स्त्री व पुरुषपात्रांच्या लोकप्रियतेच्या बाबतींतही अशीच स्थिति आढळते. ज्या ज्या ठिकाणीं त्यांनीं प्रत्यक्ष अनुभवाऐवजीं अतिर-ञ्जित भावनेचा उपयोग केला आहे त्या त्या ठिकाणीं सामान्य वाचकांचीं मनें अद्याप स्तिमित होतांना आढळतात. सामान्य वाचकांची दृष्टि गडकऱ्यांच्या

सामान्य गुणांकडून विशेष गुणांकडे वळविणें हेंच आजच्या टीकाकारांचें व स्मृतिदिन करणाराचें कार्य आहे. तथापि पहिल्या पहिल्या टीकाकारांवर तरी सामान्य लोकमताची प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष छाप पडल्यावांचून राहिली नाहीं. वस्तुतः " रिकामपणची कामगिरी " म्हणजे गडकऱ्यांच्या अनुपमेय विनोदाची व अप्रतिहत भाषौघाची खाण आहे. तथापि कित्येक टीकाकार त्यांच्या " पुण्यप्रभाव " " प्रेमसंन्यास " वगैरेंतील विनोदावरूनच त्यांचे गुणावगुण ठरवूं पाहतात. हें देखील सामान्य लोकमताच्या अप्रत्यक्ष दडपणाचेंच लक्षण म्हटलें पाहिजे.

त्यांच्या विनोदाचा उगम ठरविण्यांतही कित्येक परंपरागत गैरसमज आढळून येतात. विनोदाचें खरें मूळ म्हणजे सृष्टींतील रम्य विसंगति पाहणारी भेदक पण सहृदय दृष्टी होय व याच दृष्टीनें गडकऱ्यांच्या विनोदाकडे पहावयास पाहिजे. तथापि कित्येक टीकाकार कै. गडकरी यांस कोल्हटकरांचे शिष्य म्हटलें म्हणजे त्यांच्या विनोदाविषयीं अधिक बोलावयास नको असें समजतात. स्वतः गडकरी आपणांस कोल्हटकरांचे शिष्य म्हणवीत ही गोष्ट खरी; पण असामान्य गुणांच्या बाबतींत गुरु-शिष्यांचे नातें एका विशिष्ट मर्यादेपर्यंतच प्रभावी ठरतें. गडकऱ्यांच्या विनोदी लेखांत जी अद्वितीय विनोदी प्रतिभा दृष्टीस पडते, ती प्रकट होण्यास गुरु म्हणजे एक निमित्त कारण होय. तथापि ही मर्यादा विसरून कित्येक टीकाकार असें भासवितात कीं, जणूं श्री. कोल्हटकर यांनीं कै. गडकरी यांचेकडून विनोदाचे धडे गिरवूनच घेतले! कोल्हटकरांचा विनोद वाचण्यात आला नसता तर गडकऱ्यांनीं खाडिलकरांच्या गंभीर राजकीय लेखासारखे लेख लिहिले असते असें या टीकाकारांचें मत आहे कीं काय कोण जाणें! वाङ्मयाच्या क्षेत्रांत सांप्रदायाचें बंड इतकें माजलें आहे कीं कांहीं दिवसांमागें एका उमेदवार टीकाकारानें श्री. तात्यासाहेब केळकर यांसही कोल्हटकरांच्या सांप्रदायांत घालण्याचा प्रयत्न केला होता! पण दोन बुद्धिमान व्यक्ती स्वतंत्रपणें विनोदी असूं शकतील ही कल्पना मात्र त्या एकमार्गी शोधकास शिवली नाहीं!

तथापि असले वादग्रस्त गुणदोष क्षणभर दृष्टीआड केल्यास एक

निर्विवाद गोष्ट सर्वांची दृष्टि व्यापून राहते. व ती म्हणजे कोणाही आधुनिक ललितलेखकास गडकरी यांचेइतकी लोकप्रियता लाभली नाहीं. गडकरी यांची " वाग्वैजयंती " प्रत्येक महाराष्ट्रीय रसिकाच्या कंठांत आहे, त्यांचीं नाटकें रंगभूमीस शोभा देत आहेत व त्यांच्या विनोदानें आबालवृद्धांस निर्मळ हास्यरसाचा आस्वाद मिळत आहे. सामान्य वाचकांस गडकरी म्हणजे एखादा जिवलगासारखे वाटतात याचें कारण भिन्न भिन्न वृत्तीच्या माणसास रंगवून सोडणाऱ्या अनेक गोष्टी गडकरी यांचे लिखाणांत एकत्र आढळतात; आणि सर्वसामान्य वाचकांस ज्याचा धक्का बसेल, असें त्यांच्या विचारांत किंवा उच्चारांत कांहींच आढळतात नाहीं. गडकऱ्यांनीं गद्यांत व पद्यांत केवळ क्षुण्ण मार्ग चोखाळला किंवा नवीन टूम आणली नाहीं असें नाहीं. पण वाचक प्रथम त्यांच्या लेखनांत गुंग होतो व नंतर त्यांची टूम नवी कीं जुनी हें पाहण्याचें त्यास भानच रहात नाहीं. उदाहरणार्थ जुन्या बखरींतील अथवा शाहिरी वाङ्मयांतील शब्द वापरण्याकडेही त्यांचा कल होता. परंतु सामान्य वाचक ठेंचाळेल अशा रीतीनें त्यांनीं ते कोठेंच वापरले नाहींत. भावना, विचार व शब्द या तिन्हीं बाबतींत वाचकांस गडकरी आपले वाटत. आपलेच विचार आपल्याहून स्पष्टपणें मांडणारा, आपल्याच भावना आपल्याहून उत्कटतेनें रंगविणारा, व आपलेच शब्द नितांत कौशल्यानें गुंफणारा हा कवि पाहून सामान्य वाचक वेडे झाल्यास नवल काय ? पण त्यांच्या लोकप्रियतेचें कारण याहूनही थोडें खोल शोधिलें पाहिजे. कित्येक आधुनिक लेखकांचें लिखाण पाहिल्यास त्यावर एखाद्या ग्रंथकाराचा, एखाद्या विचारसांप्रदायाचा, अथवा एखाद्या भाषासांप्रदायाचा ठसा इतका स्पष्ट दिसतो कीं, तो लेखक व त्याचे वाचक यांच्या दरम्यान तो जणू भिंती-प्रमाणें उभा राहतो. कोणी भाषा सुधारण्याचा विडा उचलला आहे, तर कोणी समाज सुधारणें हें ध्येय ठेऊन लिहितो, तर कुणाच्या लिखाणांत लिपी सुधारण्याचें वेड दिसून येतें, तर कोणी कर्माकर्म–विचारांत गुंग आहे ! बरें, कांहीं पहावेत तर त्यांना कशाचाच नाद नाहीं. आणि त्यांच्या वैशि-ष्ट्यहीन लिखाणाचाही पण कोणास नाद लागणें शक्य नाहीं ! उलट गड-

कऱ्यांचें लिखाण वैशिष्टयपूर्ण व स्वरूपसुंदर असून त्यावर कोणत्याही अवांतर फंदाची फाजील छाप नव्हती. आणि त्याहूनही विशेष म्हणजे, तशा दृष्टीनें पाहणाराला त्यांच्या यच्चयावत् लिखाणात महाराष्ट्र प्रेम दिसून येईल. मराठी मुलूख व महाराष्ट्रीय चालीरीती यांबद्दल त्यांस उपजत अभिमान होता. त्यांच्या सर्व लिखाणांतून त्यांच्या महाराष्ट्रीय मनाची मोहनी वाचकांवर पडते, व त्यांस त्याबद्दल न कळत आपलेपणा वाटूं लागतो. मुलखाविरहित ( outlandish ) समाजचित्रें अथवा इंग्रजी सांचांतून ओतलेलीं वाक्यें-तर त्यांच्या लिखाणांत नाहींतच; परंतु आपल्या समाजावर टीका करीत असतांही ते इतक्या आत्मीयतेनें करतात कीं, टीकेनेही ते अधिक जवळचे वाटूं लागतात. एखाद्या पाश्चात्य लेखकाचें शिष्यत्व मिरवणाराची अथवा उलथापालथ करण्याकरतांच स्वभाषेंत व स्वगृहांत प्रवेश करणारांची इतकी अमोघ मोहनी कशी पडावी ?

परंतु वाङ्मयाच्या जीवनांत एक काळ असा येतो कीं ज्यावेळीं नावीन्य हेंच एक प्रशंसापत्र ठरतें. आजचें मराठी वाङ्मय पाहिल्यास अशीच स्थिति दिसून येईल. विचाराचे व कलेचे नवे नवे नमुने नित्य बाहेर पडत आहेत. अशा वेळीं नवख्या बुद्धीस गडकऱ्यांची महाराष्ट्रावरील मोहनी कमी झाली कीं काय असेंही वाटूं लागतें. तथापि. नावीन्यामुळें आकर्षक वाटणारें वाङ्मय टिकाऊ गुणांच्या अभावी अल्पकाळांतच मागें पडल्या-वरही गडकऱ्यांच्या वाङ्मयाची मोहिनी पहिल्याइतकीच राहील यांत शंका नाहीं म्हणूनच आजच्या नावीन्यप्रीयतेच्या काळांतही एकाद्या वाङ्मकृतीचें केवढेंही कौतुक झालें तरी " गडकरी " अथवा " गोविंदाग्रज " हें नांव उच्चारतांच वाटणारा आदर मात्र कोणाच्या वाट्यांस आलेला दिसत नाहीं. आज महाराष्ट्रभर साजरे होणारे स्मृति-दिन हे या चिरस्थायी आदराचेंच द्योतक होत.

# माधवज्यूलियन्



महाराष्ट्राच्या वाङ्मयक्षेत्रांत ज्यांचें नांव सर्वतोमुखी आहे अशा पहिल्या प्रतीच्या साहित्यिकांत प्रो. माधवराव पटवर्धन यांची गणना होऊं लागल्यास कित्येक वर्षें झालीं; आणि त्यांचें वय लक्षांत घेतां ते जवळजवळ तारुण्यांतच विख्यात झाले, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांच्या प्रसिद्धीस त्याजविषयीं वाटणाऱ्या असामान्य कुतूहलामुळें सुरुवात झाली; व आज प्रो. माधवराव पटवर्धन अथवा 'माधव ज्यूलियन्' हे नांव सर्वतोमुखीं झाल्यावरहि त्यांज-विषयींचें कुतूहल कमी झालेलें नाहीं. पटवर्धनांच्या ग्रंथांवर विपुल टीका झाल्या आहेत; आणि त्यांस व्यक्तिशः ओळखणाऱ्या लेखकांनीं प्रसंगोपात्त त्यांजविषयीं बरेंवाईट वैयक्तिकहि लिहिलें आहे. परंतु या वाङ्मयीन व वैयक्तिक टीका साकल्यानें वाचल्या, तरीहि अपरिचितास माधवराव पटवर्धन या व्यक्तीविषयीं यथार्थ बोध होईल असें मला वाटत नाहीं; आणि यांतच त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें वैशिष्ट्य सांठविलेलें आहे.

आजच्या महाराष्ट्रवाङ्मयक्षेत्रांत वाङ्मयगुणांच्या दृष्टीनें अथवा वैयक्तिक विशेषांच्या दृष्टीनें, माधवराव पटवर्धन यांच्या इतका बहुगुणी मनुष्य दुसरा क्वचितच दाखवितां येईल. पण ते केवळ बहुगुणीच असते तर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें आकलन करणें फारसें कठीण झालें नसतें. त्यांच्यांतील गुण हे एकमेकांशीं इतके विरोधी आहेत कीं, भावी काळांतील एखादा संशोधक त्यांच्या प्रत्येक ग्रंथागणिक एकेका स्वतंत्र कर्त्याची खास कल्पना करील; आणि जी स्थिति त्यांच्या ग्रंथांची तीच वैयक्तिक स्वभावविशेषांचीहि होय. अशा

स्थितींत त्यांच्यावरील टीकालेखांनींच काय, पण दीर्घकालच्या प्रत्यक्ष परिचयानेंहि त्यांच्या व्यक्तिमत्वाचें संपूर्ण ज्ञान होणें ही सोपी गोष्ट नाहीं; आणि म्हणूनच माधवरावांविषयीं अखिल महाराष्ट्रांत वसणारा आदर व वाटणारें प्रेम दिवसेंदिवस वाढत असलें तरी कुतूहल मात्र कमी होत नाहीं.

सुमारें चौदा वर्षांमागें पुण्याच्या सुप्रसिद्ध रविकिरणमंडळानें आपले कवितासंग्रह प्रसिद्ध करण्यास प्रारंभ केला; व त्या संग्रहांतील ज्यांच्या कवितांनीं विद्वानांचें व अविद्वानांचें जास्तींत जास्त लक्ष वेधून घेतलें ते तरुण कवि म्हणजे ' माधव ज्यूलियन् ' हेच होत. माधवरावांच्या कवितेचें वाङ्मयांतील स्थान ठरविण्याचें स्थळ हें नव्हे; तथापि वाचकांच्या मनाची पकड प्रथमदर्शनींच घेण्याचें सामर्थ्य त्यांच्या काव्यांत अगदीं प्रथमप्रासूनच आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. या सामर्थ्याचें पृथक्करण केवळ शाब्दिक भाषाविशेषापासून खोल अंतरंगापर्यंत हवें तेवढें करतां येईल. परंतु त्या सर्वांतून शेवटीं जी एकच गोष्ट स्पष्ट होईल ती म्हणजे, त्यांच्या लेखनांतील ओळीओळींत, शब्दाशब्दांत प्रतिबिंबित झालेलें त्यांचें चित्ताकर्षक व्यक्तिमत्व. ज्या काव्यांनीं माधवराव प्रथम आणि जवळ जवळ एकदम विख्यात झाले, त्याविषयीं तत्कालीन टीकाकारांनीं कांहींहि म्हटलें असलें तरी मराठी भाषेंतील अत्यंत सुंदर अशीं कित्येक भावगीतें त्यांत आहेत, असेंच अखेरचें मत कोणासहि द्यावें लागेल. अद्‌भुतरम्य प्रेम व भाषेची नखरेबाज नवलाई यांच्या मिलाफामुळें माधवरावांचीं हीं भावगीतें तेव्हांपासून आतांपर्यंत सार्वत्रिक चर्चेचा विषय होऊन बसलीं आहेत.

" पुलावरिल वळणावर दचकुनि बेहस्तांतिल परि ।
दाविसी स्मित अद्‌भूत पळभरी "

* * *

" उत्फुल्ल मिजाशींत पदें टाकित जाशी
मार्गांत किती लोळण घेतात बिचारीं "

* * *

" उषा जाहली जागी, सखे, तूंहि हो झणीं
उषेसारखा उंची करीं साज साजणी "

यासारख्या बेहोष प्रेमाच्या पंक्ति माधवरावांच्या तत्कालीन काव्यरचनेंत सर्वत्र विखुरल्या आहेत. अनेक किरकोळ कवि आपल्या पंचविशींत जीं प्रेमगीतें लिहितात, त्यांहून माधवरावांच्या प्रेमगीतांत कोणता विशेष आहे याची चर्चा अल्पावकाशांत करतां येणार नाहीं; व ती चर्चा करूनहि त्यांच्या प्रेमगीतांतील उदात्त भाग सर्वांसच आकलन करतां येईल असें नाहीं. तथापि ज्यांस हे सूक्ष्म वाङ्मयविशेष आकलन करतां येणार नाहींत, त्यांसहि चकित करून सोडतील असे व्यक्तिविशेष माधवरावांच्या अंगीं आहेत; आणि त्यांपैकीं एक म्हणजे, ज्या वेळीं माधवराव वर उध्दृत केलेल्या रम्य काव्यपंक्ति तरुण महाराष्ट्राच्या हृदयावर फेकीत होते त्याच वेळीं त्याच हातांनीं ते पंडितांस मान्य होण्यासारखा व होतकरू विद्वानांस मार्गदर्शक झालेला ' फार्शी–मराठी कोश.' रचीत होते ! ' माधव ज्यूलियन् ' यांच्या नखरेल गझलांचें अनुकरण करणाऱ्यांस, मला वाटतें, अशा प्रांतांत माधवरावांचें अनुकरण करणें थोडें जडच जाईल.

वर वर्णन केलेला काळ म्हणजे १९२३–२४चा सुमार होय. त्या वेळीं माधवराव येथील न्यू इंग्लिश स्कूल बोर्डिंग हाऊसचे सुपरिटेंडेंट म्हणून काम पाहत असत, व त्याबरोबरच फर्ग्युसन् कॉलेजमध्यें पर्शियनचे प्रोफेसर म्हणूनहि काम करीत असत. भावनाप्रधान काव्य, विद्वत्ताप्रचुर कोशरचना, वृत्तीचा रंगेलपणा आणि तारुण्य यांबरोबरच सुपरिटेंडेंट म्हणून बजावण्याच्या कर्तव्यांत कडक शिस्तीची आवड एवढे विविध गुण पाहणाऱ्यासहि माधवरावांच्या व्यक्तिमत्तेच्या वैचित्र्याबद्दल आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नसतें. प्रो. पटवर्धन त्यावेळीं वयानें २८।२९ वर्षांचे असतील; दिसण्यांत मात्र ते २३।२४ वर्षांचे दिसत.

माधवरावांच्या वाङ्मयीन जीवनाच्या या वसंतऋतूंत वाङ्मयपुष्पांच्या ज्या बहरास प्रारंभ झाला त्यांत अद्यापि खंड पडलेला नाहीं म्हटलें तरी चालेल. रविकिरणमंडळाचीं ' किरण. ' ' उषा ' व ' शलाका ' हीं तीन पुस्तकें प्रसिद्ध होऊन ते सर्वांच्या कुतूहलाचा विषय होतात न होतात तोंच त्यांस

विपरीत परिस्थितीमुळें कांहीं काळ व्यवसायांतर व स्थलांतर करावें लागलें. तथापि ज्या वैयक्तिक क्षुद्र वैरभावास हें साधतां आलें त्यास अर्थात् माधवरावांच्या काव्यास किंवा विद्वत्तेस स्पर्शहि करतां आला नाहीं. पुणें सोडून अंमळनेरास गेल्यावर माधवरावांचें ग्रंथलेखन पूर्वीहूनहि जोरानें सुरू झालें. अंमळनेर येथें असतांना त्यांनीं सुप्रसिद्ध 'सुधारक' काव्य लिहावयास हातीं घेतलें. आतांपर्यंत रमणीच्या हृदयांत अवगाहन करणारें त्यांचें निर्मळ मन व्यवहाराच्या धकाधकींत कपट, नैष्ठुर्य, विश्वासघात, मत्सर, अकारण वैर वगैरे विषारी वृत्तींशीं झगडून एखाद्या पाजळलेल्या सुऱ्याप्रमाणें तीव्र झालें होतें. 'सुधारक' काव्यांतील चार हजार ओळींत भरून राहिलेला उपरोधाचा जहरीपणा म्हणजे पहिली ठेंच खाऊन जागृत झालेल्या माधवरावांच्या तीव्र बुद्धीचे पट्ट्याचे हातच होत. या औपरोधिक व व्यवहार-चिकित्सक दीर्घ काव्याबरोबरच माधवराव एक नितान्त भावनामय असें खंडकाव्यहि लिहीत होते. तें म्हणजे 'विरहतरंग' हें होय. हीं दोन काव्यें लिहून होतांच माधवरावानीं आपला सुप्रसिद्ध 'छंदोरचना' हा ग्रंथ पुरा करून प्रसिद्ध केला. या ग्रंथानें विद्वत्तेबरोबरच त्यांनीं आपली शास्त्ररचनेची प्रतिभादेखील विद्वानांच्या प्रत्ययास आणून दिली.

'छंदोरचना' प्रसिद्ध झाल्यास आज सुमारें नऊ वर्षें झालीं, व माधवराव पटवर्धन म्हणतांच आज भाषाशैली, विद्वत्ता, विपुल रचना इत्यादि जे गुण डोळ्यांसमोर उभे राहतात त्यांची वाढ याच काळांत पूर्ण झाली. आधुनिक महाराष्ट्रांत विद्वान् बरेच झाले आणि कवीहि कमी झाले असें नाहीं; तथापि वयाची बत्तिशीहि पुरी उलटली नाहीं तोंच एकीकडे 'सुधारका' सारखें भेदक दीर्घ काव्य तर दुसरीकडे 'छंदोरचना,' 'फार्शी-मराठी कोश' यांसारखे तीव्र बुद्धि व दीर्घोद्योग दर्शविणारे ग्रंथ लिहिणारा कवि महाराष्ट्रास जितका अद्भुत तितकाच आदरणीय वाटूं लागला असल्यास त्यांत नवल नाहीं. 'माधव ज्यूलियन्' या गंगाजमनी नांवापासून वाढत गेलेलें वाङ्मयजगांतील कुतूहल, कवीच्या या कृतींनीं अधिकच वाढीस लागलें.

प्रस्तुत लेखकाचा आणि माधवरावांचा परिचय याच काळांत विशेष दृढ झाला. माधवरावांशीं प्रत्यक्ष परिचय होतांच जी पहिली गोष्ट लक्षांत येते ती म्हणजे त्यांचा अर्भकासारखा सरळ स्वभाव. अर्थात् तीव्र बुद्धिमत्तेच्या विरोधी पार्श्वभूमीमुळें हा सरळ स्वभाव विशेषच आकर्षक दिसतो. विद्यमान लेखकांपैकीं ज्या थोड्या लेखकांस संभाषणकलेची देणगी आहे त्यांत माधवराव यांस अग्रस्थान द्यावें लागेल. ज्यांस संभाषण म्हणजे स्वतःची प्रसिद्धि ऐकून आपणांकडे आलेल्या चाहत्यांपुढें आपली अब्रू संभाळण्याकरितां केलेल्या चार कृत्रिम कोट्या असें वाटतें, त्यांपैकीं माधवराव हे अर्थातच नव्हत. माधवरावांच्या भाषणांतील पहिला गुण म्हणजे सहृदयता. व्यक्तीविषयीं बोलत असोत कीं कवितेविषयीं बोलत असोत, अप्रसिद्धाविषयीं बोलत असोत कीं प्रसिद्धाविषयीं बोलत असोत, ते क्षणांत तद्रूप होतील आणि क्वचित् भानहि विसरतील. केवळ व्यवहारी पोटभरू लोक अशा प्रकारें भाषण करणाऱ्याचें मोठेपण ओळखण्याऐवजीं त्याचा स्वार्थाकडे कसा उपयोग करावयाचा इकडेच नजर ठेवीत असले, तरी मोठ्या मनाचीं माणसें स्वतःला विसरून आपलें हृद्गत व्यक्त करितात तेव्हांच्या संभाषणाची सर धूर्त भाषणास अथवा कृत्रिम शब्दपांडित्यास क्वचितच येईल. विशेषतः समाजांतील कपटपटु व्यक्तींच्या दुष्टपणास बळी पडलेल्या सज्जनांविषयीं बोलतांना तर माधवराव अत्यंत आवेशानें बोलतात. एकदा असेंच बोलत असतां त्यांनीं एकदम माझ्या टेबलावरील जॉर्ज ब्रँडिसचा ग्रंथ उचलून त्यांतील " जगांतील दुष्टपणा आणि मूर्खपणा या दोन दगडांच्या मध्यें सांपडून बिचाऱ्या सज्जनांचा चुराडा उडतो " अशा अर्थाचें वाक्य वाचून दाखविलें, त्या वेळचे त्यांचे डबडबलेले डोळे आणि थरथरणारे ओंठ मला अद्यापि आठवतात.

भावना व विद्वत्ता या दोन्ही अंगांमुळें माधवरावांचें खाजगी संभाषण अत्यंत प्रभावी होत असलें, तरी विविध प्रकारच्या श्रोत्यांशीं समरस होऊन त्यांच्या आवडत्या विषयावर बोलणें, त्यांचे विचार केवळ अगत्यानेंच नव्हे तर उत्साहभरानें ऐकून घेणें इत्यादि आनुषंगिक गुणहि त्यांच्या अंगीं भरपूर सांपडतात; व त्यामुळेंच मानवी जीवन आणि साहित्य यांवर अव्वल दर्जाचे विचार व्यक्त करण्यापासून ते वैयक्तिक क्षुल्लक वादापर्यंत सर्व प्रकारच्या विषयांवर—सभों-

वताल्च्या लोकांच्या मगदुराप्रमाणें—सारख्याच उत्साहानें बोलतांना माधवराव आढळतील. याच त्यांच्या संभाषणगुणांची परिणति अलीकडे जाहीर वक्तृत्वांत होत असावीसें मला वाटतें. विद्वत्ता, कळवळ, आवेश, रेखीव व अस्खलित भाषाशैली या गुणांचा संगम त्यांच्या अलीकडील व्याख्यानांत जेवढा सांपडतो तेवढा इतरत्र क्वचित् पाहावयास सांपडेल. किंबहुना माधवरावांच्या विविध रूपांपैकीं याच रूपांत सध्यां ते महाराष्ट्रांत विशेष प्रभावी ठरत आहेत असें म्हटलें तरी चालेल. माधवरावांनीं आपल्या जीवनक्रमास प्रारंभ भावनाप्रधान कवि म्हणून केला; विद्वत्ताप्रचुर भाषाशास्त्रविषयक लेखनानें त्या कीर्तींत भर घातली; व आज ते अधिकारयुक्त वाणीनें समकालीन महाराष्ट्रियांस विविध प्रश्नांवर बहुमोल उपदेश करण्याचें काम करीत आहेत. आणि म्हणूनच यंदाच्या साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षस्थानीं त्यांची निवड करण्यांत महाराष्ट्रानें आपली गुणग्राहकता योग्य वेळीं प्रकट केली आहे यांत शंका नाहीं.

खाजगी संभाषणांत जसा वैयक्तिक सुखदुःखांचा व भावनांचा माधवरावांस उपयोग होतो तद्वत् अलीकडील जाहीर वक्तृत्वांत त्यांस त्यांच्या सूक्ष्म समाजनिरीक्षणाचें, देशभक्तीचें आणि आत्मप्रत्ययाचें साहाय्य होतें. त्यांचें भाषण भाषाशुद्धीवर असो कीं पुनर्विवाहावर असो, त्यांत केवळ शाब्दिक वक्तृत्वाहून कांहींतरी अधिक आहे, हें श्रोत्यांस पटल्यावांचून राहत नाहीं. आणि हें ‘ कांहींतरी ’ म्हणजे माधवरावांस दिवसेंदिवस अधिकाधिक प्रतीत होऊं लागलेलें जीवनकार्य हें होय. माधवराव कवि होते व आजहि आहेत, विद्वान् होते व आजहि आहेत. भाषाशास्त्रविषयक व्यासंगाचा व्याप तर ते अधिकाधिक अंगावर घेत आहेत ( छंदःशास्त्रावरील सुधारून वाढविलेला प्रमाणभूत ग्रंथ ते लवकरच प्रसिद्ध करणार आहेत ). तरीहि समाजसुधारकाची भूमिका हीच त्यांची सर्वांत अलीकडची खरी भूमिका म्हटली पाहिजे. स्वजनांविषयीं प्रेम आणि त्यांच्या दोषांविषयीं तीव्र जाणीव यांमुळें त्यांस अलीकडे समाजास जागृत करण्याचें जणूं काय व्रतच घ्यावें लागलें आहे. माधवराव यांची ही भूमिका नवीन असली तरी तिच्या मुळाशीं असलेल्या भावना मात्र नवीन नाहींत. महाराष्ट्रांत ज्या विशिष्ट विचारसंप्रदायांत

देशाभिमानाचें विशेष प्राधान्य दिसतें, त्यांत माधवरावांची गणना पहिल्यापासून नसली, तरी देशभक्तींत ते कधींच कोणास हार गेले नसते.

अशा बहुगुणी व्यक्तींत वेगवेगळ्या अवस्थांत वेगवेगळे गुण विकास पावलेले दिसले तरी जगास दिसलेल्या गुणांखेरीज दुसरेहि कित्येक गुण त्यांच्या संग्रहीं असतात, ही एक गमतीची गोष्ट म्हणून नमूद करण्यास हरकत नाहीं. बर्नार्ड शॉ यांच्याविषयीं चेस्टरटन् यांनीं असें म्हटलें आहे कीं, ग्रंथकारांस न साधणारे ग्रंथप्रकाशनाचें व्यापारी काम तर बर्नार्ड शॉ यांस चांगलें समजतेंच पण त्याच्याहि पुढें जाऊन बर्नार्ड शॉ हे प्रकाशकाच्या दुकानांतील कारकुनाच्या कामांतदेखील चांगले वाकबगार आहेत! माधवराव पटवर्धनहि अशाच कित्येक विलक्षण व किचकट गोष्टींत नैपुण्य दाखवून आपल्या चिरपरिचितांससुद्धां चकित करितात. मुलांचें संगोपन, हायस्कुलांतील शिक्षणपद्धति, बंगल्यांचे ' प्लॅन ', विविध रोगांची चिकित्सा यांपैकीं कशावरहि बोलत असतां ते जणूं आपल्याच विषयावर बोलत आहेत असें भासेल. अर्थात् या सर्वांच्या बुडाशीं त्यांची शास्त्रीय बुद्धि आणि चिकाटी हेच गुण आहेत. तथापि कवि 'माधव ज्यूलियन्' म्हणतांच जे गुण डोळ्यांपुढें उभे राहतात, त्यापेक्षां फारच वेगळे गुण म्हणजे त्यांच्या प्रत्यक्ष परिचयानें प्रत्ययास येतात. गणित विषय हा त्यांचा आवडता विषय होता व आजहि तो विषय शिकविणें त्यांस आवडतें, एवढें हें सांगितलें म्हणजे त्यांच्या बुद्धीच्या विविधत्वाविषयीं कल्पना येईल. असाच आणखी एक अनपेक्षित नसला तरी मराठी वाचकवर्गास फारसा ज्ञात नसलेला त्यांचा गुण इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व. आमच्या महाराष्ट्रांत इतर कित्येक गोष्टींप्रमाणें इंग्रजीच्या ज्ञानाविषयींही कांहीं विचित्र कल्पना बसून गेल्या आहेत; व त्यामुळेंच विपुल पाठांतरातील प्रयोगांचे व कल्पनांचे प्रतिध्वनि फोनोग्राफप्रमाणें आपल्या लेखनांत व भाषणांत उठवणाऱ्यांसच महाराष्ट्रांत इंग्रजीच्या प्रभुत्वाचें प्रशस्तिपत्र आजवर मिळालें आहे; व त्यामुळेंच माधवरावांसारख्या जातिवंत व अव्वल दर्जाचें इंग्रजी लिहिणाऱ्याच्या व बोलणाऱ्याच्या नांवाचा गाजावाजा फारसा झालेला नाहीं.

आपल्या काव्यानें विद्वत्तेनें व स्वजनांविषयींच्या कळकळीनें माधवरावांनीं चाळिशीच्या आंतबाहेरच महाराष्ट्रांत मानाचें स्थान मिळविलें आहे. आणि त्यांची

कळकळ व दीर्घोद्योग पाहतां ते महाराष्ट्राच्या आदरास अधिकाधिक पात्र होतील यांत शंका नाहीं. अर्वाचीन महाराष्ट्राच्या पुढाऱ्यांस कांहीं अंशीं पक्षघात झाल्याचें दृश्य अलीकडे मोठ्या खेदानें पाहावें लागत आहे. ज्यांत बुद्धिमत्ता असेल त्यास उद्योग नको, हे दोन्हीं गुण असतील त्यांत बहुधा तळमळ नसेल, आणि प्रसंगवशात् हीं तिन्ही असलीं तर धडाडी व आत्मविश्वास यांचा अभाव. यामुळें दिवसेंदिवस राजकीय क्षेत्रांतच नव्हे, तर वाङ्मयाच्या व समाजकार्याच्या क्षेत्रांतहि कर्तबगारीचें दुर्भिक्ष्य जाणवूं लागलें आहे. अशा स्थितींत माधवरावांसारख्या व्यक्तीकडे समाजानें आदरानें व आशेनें पाहि-ल्यास त्यांत नवल नाहीं. अर्थात् त्यांच्या सामर्थ्याप्रमाणेंच त्यांच्या सामर्थ्याच्या मर्यादाहि स्पष्ट आहेत. माधवरावांच्या काव्यांप्रमाणेंच त्यांच्या सामाजिक आणि सांस्कृतिक कार्यासहि त्यांच्या विशिष्ट स्वाभाविक प्रवृत्ति मर्यादित केल्यावांचून राहत नाहींत. भावना व अनुभव यांच्या दृष्टीनें अव्वल दर्जाच्या त्यांच्या काव्यशक्तीस त्यांच्या भाषाविषयक एकान्तिक मतांनीं मर्यादित केलें आहे. ते आपल्या सुंदर भावनांस अलीकडे कांहीं ठरीव कल्पनांच्या सांच्यांत बळजबरीनें बसवून जायबंदी करीत असतात. तसेंच त्यांच्या सांस्कृतिक कार्यांतहि "First things must always come first" या लेनिनच्या प्रिय उक्तीतील सत्याचें त्यांस भान राहत नाहीं. एखाद्या दुय्यम गोष्टीलाच ते पहिलें स्थान देऊन बसतात. अर्थात् अशा स्थितींत त्यांच्या चाहत्यांइतकें दुसऱ्या कोणास वाईट वाटणार? आजच्या महाराष्ट्रीय सांस्कृतिक पुढाऱ्यांत माधवराव यांस पहिल्या ओळींत स्थान आहे; आणि म्हणूनच त्यांनीं आपलें सामर्थ्य वापरण्यांत तरतमभावाकडे दुर्लक्ष केल्यास त्यांत राष्ट्रीय हानि आहे. पण कलेच्या व संस्कृतिसेवेच्या क्षेत्रांत माधवरावांनीं अशा प्रकारच्या आपल्या चाहत्यांच्या आपुलकीच्या गाऱ्हाण्यांस अनेकवार जागा दिली आहे. अशा प्रसंगीं दुर्दैवानें माधवरावांचे सद्गुणच दुर्गुणांचें कार्य करूं लागतात. कारण, एखादी गोष्ट वरवर करण्याचें माधवरावांना माहीतच नाहीं. जें हातीं घेतील त्याचा ते पिच्छा पुरवतील!

ज्याला इंग्रजींत 'Wrong Emphasis' म्हणजे अस्थानीं जोर देण्याचा दोष म्हणतां येईल, अशा प्रकारचा दोष माधवरावांना वर सांगि-

तल्याप्रमाणें सार्वजनिक कार्यांतच नडतो असें नव्हे, तर त्यांस त्यांच्या खाजगी जीवनांतहि त्यानें बरेंच छळलें आहे. काव्य, संस्कृति, याप्रमाणें व्यावहारिक घटनांचें मर्मस्थान शोधण्यांतसुद्धां ते कित्येकदां असाच 'जागा चुकण्याचा' दोष करितात. दुःखानें विव्हल व्हावें आणि अन्यायानें संतापावें, असें माधवरावांनींच. पण दुर्दैवानें अनेकदां या दुःखांचें व अन्यायांचें मूळ ते भलतीकडेच कल्पितांना आढळतात; आणि अशावेळीं त्यांच्या प्रचंड शक्तींचा रोख अयोग्य ठिकाणीं लागू होणार म्हणून वाईट वाटल्यावांचून राहत नाहीं. या दृष्टीनें माधवरावांच्या रागलोभांच्या विषयांची पीठिका शोधणें मोठें मनोरंजक होईल. माधवराव मूळचे काव्यात्म वृत्तीचे सुधारक म्हटले पाहिजेत; आणि म्हणूनच ते समाज, कला, भाषापद्धति वगैरे प्रत्येक बाबतींतील रूढीवर जोराचा हल्ला करीत गेले. परंतु आजमितीस ते प्रसंगोपात्त या विध्वंसकवृत्तीवरहि हल्ला चढवितांना दिसतील ! कधीं ते संकराची ध्वजा उभारण्यास सांगतील, तर कधीं संकराविरुद्ध हत्यार चालविण्यास उठतील. पण या सर्वच अवस्थांत त्यांच्या प्रामाणिकपणाविषयीं व स्वजनाकरितां देह झिजविण्याच्या तयारीविषयीं मात्र कोणासहि आदरच दाखवावा लागेल.

आजकाल माधवरावांस हिंदु संस्कृतीच्या व हिंदु जातीच्या रक्षणाविषयीं विशेष तळमळ लागून राहिली आहे, हें त्यांच्या भाषणांवरून व लेखनावरून दिसून येईल. तसेंच समाजसुधारणेच्या बाबतींतहि केवळ जुन्यावर हल्ला चढवून भागणार नाहीं, प्रथम नावीन्यभक्तांत प्रामाणिकपणा, कर्तव्यबुद्धि इत्यादि गुणांचा विकास झाला पाहिजे, याचाहि प्रत्यय त्यांस वाढत्या प्रमाणांत येऊं लागला आहे. आणि या त्यांच्या नवीन दृष्टीमुळेंच ते अलीकडे प्रभंजनापेक्षां प्रबोधनाचेच सूर अधिक काढीत असतात. छंदःशास्त्र, कोशरचना यांसारखीं कार्यें आवडीचीं कामें म्हणून केलीं, तरी माधवराव दिवसेंदिवस समाजजागृतीचें व संस्कृतिरक्षणाचें काम अधिकाधिक अंगावर घेणार यांत शंका नाहीं.

सारांश, सरळपणा व प्रामाणिकपणा यामुळेंच ज्यांस हाल सोसावे लागले, आपल्या शत्रूंसहि ज्यांनीं अन्यायानें वागविलें नाहीं, ज्यांच्या मनांत कर्तव्य-

बुद्धि व न्यायबुद्धि सदैव जागृत असून त्याकरितां जे शरीर झिजविण्यास तयार आहेत, असे माधवरावांसारखे विद्वान कार्यकर्ते आजच्या महाराष्ट्रांत दुर्मिळ होत. यशस्वी अध्यापक, विद्वान् ग्रंथकार, लोकप्रिय कवि, या अनेक नात्यांनीं त्यांचा लौकिक वृद्धिंगत होत आहेच. तसेंच आपल्या सौजन्यानें ते आपल्या मित्रमंडळाच्या व कर्तव्यनिष्ठेने अखिल महाराष्ट्राच्या प्रेमासहि अधिकाधिक पात्र होत आहेत. अर्थात् प्रो. माधवराव पटवर्धन यांच्या हातून दिवसेंदिवस अशीच अधिकाधिक वाङ्मयसेवा व समाजसेवा घडो, याखेरीज त्यांच्या आजच्या सन्मानप्रसंगी मजसारखा त्यांचा चाहता दुसरी कोणती इच्छा करणार ?

# कवि यशवंत ( यशोधन )

काहीं महिन्यांमागें बडोदें येथें भरलेल्या एका वाङ्मय—संमेलनांत विद्यमान कवींच्या लोकप्रियतेवर मतें घेण्यांत आलीं. त्या प्रसंगीं रा. यशवन्त यांस शंभरांपैकीं सत्तरांहून अधिक व उरलेलीं रा. चंद्रशेखर व मायदेव या दोघांत मिळून पडलीं ! रा. तांबे यांच्यासारखे प्रतिभावान् कवि ज्या विद्वत्समूहाच्या गणतींतहि नाहींत त्यांचीं मतें प्रमाण धरणें कठिण असलें तरी यावरून एक गोष्ट निर्विवाद सिद्ध होते; आणि ती म्हणजे रा. यशवन्त यांची लोकप्रियता. पण यशवन्तांची लोकप्रियता अजमाविण्याकरतां एवढा खटाटोप करण्याचें कारणच नाहीं. त्यांच्या काव्यसंग्रहाची पहिली आवृत्ति इतक्या झटपट खपली हेंच त्यांच्या लोकप्रियतेचें उत्कृष्ट प्रमाण होय. अर्वाचीन कवींत इतकी लोकप्रियता गोविंदाग्रजांखेरीज क्वचितच कोणाच्या वांट्यास आली असेल. लोकप्रियता कधीं कधीं एखाद्या लहरी ललनेप्रमाणें भासजी; तरी तिच्या लहरींतहि हॅम्लेटच्या वेडाप्रमाणें बहुधा कांहीं ना कांहीं कार्य—कारणभाव आढळल्याखेरीज रहात नाहीं.

रा. यशवन्त हे स्वतःस कोणाहि जुन्या—नव्या, इंग्रजी व मराठी कवींचे प्रत्यक्ष शिष्य म्हणवीत नाहींत. अथवा कोणत्याहि नवसांप्रदायामुळें अथवा ‘ टुमी ’मुळें ते लोकांच्या मनांत भरले असें म्हणतां येत नाहीं. त्यांस निखालस मुलांचे, फुलांचे, प्रणयांचे वा शाहिरी कवी म्हणतां येणार नाहीं. दाक्षिण्याविषयीं फारसे ख्यात नसलेले पुणेरी तरुणांचे थवेच्या थवे त्यांनीं आपल्या स्निग्धगंभीर, भावकम्पित सुरांनीं नागाप्रमाणें डोलावयास लाविले

असले तरी केवळ काव्यपठन हें त्यांच्या कीर्तीचें महत्त्वाचें अंग नव्हे. अशा स्थितींत बडोदें, ग्वालेर, नागपूर यांसारख्या दूरदूरच्या ठिकाणींहि त्यांच्या काव्यांतील कोणत्या गुणानें मोहनी टाकिली आहे हा खरोखरच विचार करण्यासारखा प्रश्न आहे. कित्येक कवींस काव्याखेरीज असणारें महत्त्वहि बिचाऱ्या यशवन्तांच्या वांट्यास आलेलें नाहीं! गोविंदाग्रज नाटककार व विनोदी लेखक म्हणूनच अधिक विख्यात आहेत. रे. टिळक कवि नसते तरीहि एक मुमुक्षु म्हणून विख्यात झाले असते. प्रो. माधवराव पटवर्धन काव्य न लिहिते तरीहि विद्वान म्हणून गाजलेच असते. परंतु रा. यशवन्तांची कीर्ति मात्र केवळ त्यांच्या काव्याच्या लोकप्रियतेवर अधिष्ठित आहे. किंबहुना अर्वाचीन काळांतील वाङ्मयसेवकांत काव्यदेवतेची अनन्य भक्ति कोणी केली असा प्रश्न निघाल्यास जीं अगदीं थोडीं नांवें घेतां येतील त्यांत रा. यशवन्त यांचें नांव अग्रस्थानीं येईल.

अशा निर्भेळ काव्यसाधनाचें कौतुक करीत असतां, आजच्या चिकित्सायुगांत त्याच्या कारण—परंपरेविषयीं कुतूहल उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहीं. शिळोप्याच्या वेळीं, केवळ फॅशन म्हणून मासिकांत पहिल्या पानावर आलेली कविता वाचणारांची गोष्ट वेगळी; परंतु जिवन्त कवित्व आणि तेंहि विद्यमान तरुण कवीच्या ठिकाणीं प्रतीत होतांच ज्यांस एक प्रकारचा अनिर्वचनीय आनंद होतो त्यांच्या आनंदाचें पर्यवसान सर्वस्वी नैसर्गिक कुतूहलांत झाल्यावांचून रहात नाहीं. कांहीं वर्षामागें ज्याचें नांवहि ठाऊक नसेल, अशा एका तरुणाचें काव्य वाचलें नाहीं असा मनुष्य आज दुर्मिळ कां व्हावा? हा काव्यौघ एकदम कोठून निर्माण व्हावा? याचा उगम विलासांत आहे कीं हालांत आहे? विद्वत्तेंत व व्यासंगांत आहे कीं केवळ प्रतिभेत आहे? प्रियाराधनांत आहे कीं ईश्वरभक्तींत आहे? अशा प्रकारचे शेंकडों प्रश्न मनांत उभे राहिल्यावांचून रहात नाहींत. आणि मौजेची गोष्ट म्हणजे या नैसर्गिक व श्लाघ्य कुतूहलाचें शमन, कालानें व स्थलानें दूर असलेल्या दिवंगत व परदेशस्थ कवींच्या बाबतींत जितकें होऊं शकतें तितकेंहि विद्यमान व निकटस्थ कवींच्या बाबतींत होऊं शकत नाहीं. उदाहरणार्थ, रा. यशवन्त यांच्याच चरित्रावरून त्यांच्यांतील काव्यांकुराचा कितपत थांग लागेल? त्यांचा जन्म

पुण्यामुंबईसारख्या विद्येच्या व विलासाच्या आगरांत झाला नसून सातारा जिल्ह्यांतील दऱ्याखोऱ्यांत झाला आहे. त्यांचा जन्माचा—लौकिक दृष्ट्या—व्यवसाय पाहिल्यास एखाद्या नाटकांतील नायकाच्या व्यवसायाप्रमाणें गायनाचा, चित्रलेखनाचा वा संशोधनाचा नसून सामान्य कारकुनीचा आहे. आणि शिक्षणाच्या दृष्टीनें पाहिल्यास त्यांच्या काव्याचें नुसतें अध्ययन व अध्यापन करणारास कमींत कमीं जेवढें शिक्षण हवें तेवढेंहि त्यांचें झालेलें नाहीं ! ज्या परिस्थितींत त्यांचें काव्य अप्रतिहतपणें निष्पन्न होत आहे ती पाहिली म्हणजे तर त्या काव्याविषयीं अधिकच आदर वाटूं लागतो, व निरुत्तर कुतूहल कुंठित न होतां ' प्रतिभा ! ' या उत्तरावरच आपलें समाधान मानूं लागतें.

' **यशोधनां** 'तील विषयांचा विचार केल्यासहि थोडीशी अशीच स्थिति होते. साधारण मानानें आजकालचा कवि घेतल्यास मार्मिकास त्याचें मर्मस्थान ताडण्यास अनुक्रमणिका वाचण्याहून अधिक यातायात करावी लागत नाहीं. कोणी प्रेमाच्या प्रान्तांत शूर असतो, तर कुणी शूर पूर्वजांचें यश गातांना विशेष खुलतो, तर कोणी सामाजिक अन्याय पाहून विशेष चवताळतो, तर कोणी वैयक्तिक छिद्रावरच घसरतो. कुणाचा विधवा हा ' वुइक पॉइंट् ' असतो ! तर कित्येकांस अर्भकांसाठीं सचित्र व अंगविक्षेपाई गाणीं लिहिण्याचा नाद असतो. अर्थात् यांपैकीं कोणतेंहि अंग चांगलें साधल्यास तें त्या कवीस भूषणावहच आहे. तथापि रा. यशवन्त यांचा यांपैकीं अमुकच एका प्रकारावर भर आहे असें त्यांच्या संग्रहांतील विषय पाहिल्यास वाटणार नाहीं. त्यांचे रसिक नेत्र शीलवती सुंदरीचें निरीक्षण करण्यांत गुंग आहेत म्हणावें तों पुढच्या एखाद्या पानांतून त्याच नेत्रांत मातेसाठीं अश्रुविमोचन चाललेलें दिसेल. एकीकडे ते ' संगीत संजीवनी ' वाठवितांना दिसतील तर दुसरीकडे अस्सल शेतकरी संप्रदायांतील ' न्याहारीचें गाणें ' भेटेल. एकीकडे ते हर्षनिर्भर होऊन स्वातंत्र्यलक्ष्मीस मुजरा करीत असलेले दिसतील, लगेच दुसरीकडे वैभवाचें भंगुरत्व प्रतिपादणारीं संक्रमणगीतें सांपडतील ! 'कोंडमारा' या गीतांतील अन्तर्वेदना पाहून आपण सुन्न होऊन कवीचें मनोमय सान्त्वन करीत असावें तों त्यापूर्वींच कवि नौकाविहारांत दंग ! अशा स्थितींत कवीचें

मर्मस्थान हातीं लागण्यापूर्वीं कवीनेंच आपली मर्मस्थानें आपल्या शब्दवेधनैपुण्यानें वेधून टाकिलीं असें भासल्यास नवल काय ?

आणि सामान्य रसिक वाचकाची अशी स्थिति झाल्यास त्यांत नवलहि नाहीं. श्री. बर्नार्ड शॉ यांच्या व्यक्ति-वैशिष्ट्याचा थांग त्यांच्या बहुतेक टीकाकारांस कां लागला नाहीं याची मीमांसा करीत असतां, प्रसिद्ध अमेरिकन लेखक फ्रँक हॅरिस यांनीं म्हटलें आहे कीं, टीकाविषयीभूत व्यक्ति ही टीकाकाराहून बहुरंगी Picturesque असल्यामुळें असा प्रकार घडतो. तोच न्याय प्रस्तुत कवीच्या बाबतींत लावावयाचा म्हटल्यास साधारण मनुष्यांत ज्या भावनांपैकीं एखादीहि तीव्र प्रमाणांत असल्यास तो भावनाप्रधान ठरेल अशा अनेक भावना प्रस्तुत कवीच्या ठिकाणीं पराकाष्ठेच्या तीव्रतेनें भासमान होत आहेत असें म्हणावें लागतें.

तथापि एवढ्यानें या सामर्थ्यवान कवीचें कोडें उकललें असें होत नाहीं. भावनांच्या प्राबल्यानें शब्दहीन होणारे अथवा नखशिखान्त कम्पित होणारेहि कित्येकांच्या पहाण्यांत असतील. तथापि अशा व्यक्तींना रा. यशवन्तांच्या कवितेसारखी एखादी कविता त्यांच्या विशिष्ट भावनेवर तरी लिहितां येईलच असें मात्र नाहीं. आणि असा विचार करूं लागल्यास प्रस्तुत कवीच्या शक्तिस्थानाचा प्रश्न अधिकच कुतूहलपूर्ण वाटूं लागतो. अथवा या गंभीर प्रश्नाकडेच थोड्याशा विनोदी दृष्टीनें पहावयाचें झाल्यास असेंहि म्हणतां येईल कीं, इतक्या अल्पकालांत आपलें ‘ यशोधन ’ स्तिमित जनतेच्या अंगावर दोनदां उधळणाऱ्या या तरुण कवीचें ‘ ट्रेड सीक्रेट ’ ( यशाचें रहस्य ) तरी कोणतें ? गोविंदाग्रजांची कविता म्हटली कीं बुद्धीस स्तिमित करणारी कल्पनेची भरारी व भाषावैभव डोळ्यांपुढें येतें. माधव ज्यूलियन म्हणतांच प्रणयाची व भाषेची नवलाई आठवते; गिरीश म्हणतांच, तोंच शीतल भावना व कोमल रचना दिसूं लागते. तसें यशवन्त यांचें कोणतें वैशिष्ट्य आपल्या मनावर ठसतें व अखेर त्यास काबीज करतें ? या प्रश्नाचें निश्चित उत्तर देणें तितकेंसें सोपें नाहीं. तथापि त्यांच्या भावनेची व भाषेची ऐट हा त्यांचा विशेष म्हटल्यास बहुतेकांस पटेलसें वाटतें. यालाच व्यापक अर्थानें ओज हा संस्कृत साहित्यांतील शब्द लावला तरी चालेल. तथापि

ओज, प्रतिभा यांसारखे शब्द रूढ होण्याच्या काळीं कितीहि अर्थवाहक असले तरी आजकाल या बंद्या नाण्यांनीं चिकित्सकबुद्धीचा निर्वाह होणें मुष्किल आहे. ऐट हा पदार्थ काय आहे ? आणि तो एखाद्या बाणभट्टांत खुद्द कालिदासाहून अथवा वाल्मीकीहूनहि अधिक कां दिसावा ? या प्रश्नांच्या खोल पाण्यांत शिरणें थोडें धोक्याचें वाटलें तरी त्यांतच कवीचे अभ्यसनीय व्यक्तिमत्व दडलें असल्यामुळें या संशोधनांत यशाचा नसला तरी आनंदाचा खास लाभ होण्यासारखा आहे. साधारण मानानें असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, परिणामकारक भावगीतें लिहिणारे कवि आत्मनिष्ठ असतात. तथापि ही काव्यात्म आत्मनिष्ठा सर्व व्यक्तींच्या ठिकाणीं सारख्याच रूपानें प्रगट होतें असें मात्र नव्हे. कोवळ्या व भीरु मनांत ती आत्मानुकंपेचें करुण रूप धारण करते, तर प्रबळ व वीर्यवान् मनोभूमींत तीच दर्पाचे ताठर रूप घेते. शेली अथवा कौपर हे बायरन्‌इतकेच किंबहुना अधिक आत्मनिष्ठ होते; तथापि पहिल्या दोहोंच्या गीतांत आत्मानुकंपेचे करुण सूर ऐकूं येतात, तर बायरन्‌चा बहुतेक काव्यप्रान्त दर्पानें दरवळलेला आढळेल. रा. यशवन्त यांच्या सामर्थ्यवान् मनांतील आत्मनिष्ठा दर्पाच्या हद्दीपर्यंत पोहोंचते न पोहोचते तोंच तिला अभिजात अभिरुचीनें समयोचित मर्यादा घातली असावी ! नाहीं तर ती कदाचित् जगन्नाथ पण्डिती वळणावर जाऊन समकालीन लोकप्रियतेला मारकहि झाली असती. आहे या स्वरूपांत मात्र ती मुग्ध कुमारिकेच्या नैसर्गिक मानीपणाप्रमाणें रसिकांचें मन अधिकच ओढून घेते. या मानी आत्मनिष्ठेचा मोहक पीळ यशोधनाच्या कणाकणांत भरला आहे असें म्हटलें तरी चालेल. उदाहरणार्थ, आद्यंतीं आढळणारीं ( अनुक्रमें ) रसिकांस व देवास उद्देशून लिहिलेलीं गीतें पहा—समर्पणवजा गीतद्वयांत कवि लिहितातः—

मज संवेदन असे नसे कीं। हवा तुला कां पोंच ?

येई भाई येथ पाही घातली ही पाणपोई।

या दोन्हीहि गीतांत स्वतःच्या थोर कर्तव्याविषयीं व निरपेक्ष त्यागशक्तीविषयीं त्यांचा दिसून येणारा सात्त्विक अभिमान आकर्षक नाहीं असें

कोण म्हणेल ? पण शेवटीं आढळणाऱ्या कवितेंत त्यांनीं प्रत्यक्ष प्रभूपुढें टिकविलेली धिटाई पाहिली म्हणजे त्यांचा आरंभींचा रसिकांपुढील आत्म-विश्वास कांहींच नव्हेसें वाटूं लागतें.

माझिया प्रयासा तुमच्या कृपेनें
काय फळ येणें भूषण तें ?

* * *

कृपेची खैरात विक्रमा विषारी
आणि ती उधारी प्राणहारी
नका मारूं मज दया दाखवून
माथा तीव्र ऊन सोसूं द्या हें ?

यांतील आत्मविश्वास परमेश्वरासहि प्रिय होईल. मग त्यानें यशोधनाची प्रभा वाढली यांत नवल तें काय ?

तथापि या मनोवेधक दर्पास तितक्याच मनोवेधक व सामर्थ्यवती वाणीची जोड न मिळती तर काय झालें असतें याचीं उदाहरणें आपल्या भाषेंत थोडीं नाहींत ! आश्चर्य वाटतें तें रा. यशवन्त यांच्या ओजस्वी वाणीचें. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं त्यांच्या काव्यास भावनेहून भाषासरणी-पासूनच्या अधिक ओज व ओघ प्राप्त झाला आहे. यांतहि त्यांची भाषा जुन्या अथवा नव्या अमुक कवीसारखी आहे असें म्हणतां येणें अशक्य आहे. आणि तसेंच पाहूं गेल्यास, कोणासारखी असती तर तीस ओज व माधुर्य या विरोधी गुणांचा एकाच वेळीं लाभ झाला असता ? ज्ञानेश्वरांची गोष्ट अनेक कारणास्तव सोडली तर पुढील कोणत्या कवीचें अनुकरण यशवन्तांस आजच्या काळांत मानवलें असतें ? मुक्तेश्वराच्या रसाळ काव्यौघांत थिटें बिचारें भावगीत कुठच्या कुठें वाहून जाईल. वामनाच्या पाण्डित्य-प्रकर्षाचा यशवन्तांच्या बाबतींत विचारच नको. बिचाऱ्या आधुनिक कवींनी आणि मोरोपन्ताप्रमाणें संस्कृत भाण्डार लुटल्यास त्याजवर प्रत्यक्ष मयूर-मंडळहि आज क्लिष्टतेचा आरोप करील ! तुकारामाच्या अभंगवाणींत शृंगारवीरादि रस ओतण्याचा यत्न व्यर्थच जाईल. आणि अगदीं

अर्वाचीन काळांतील गोविंदाग्रजांच्या भाषेचा यशवन्तांच्या भाषेवर किंचिन्मात्र परिणाम झालेला नाहीं हें कोणीहि सांगूं शकेल. कधीं कधीं रामदासांच्या कणखर भाषासरणीशीं या चाफळच्या कवीचा कांहीं संबंध पोहोंचतो कीं काय असा मात्र संशय येतो. तथापि विषय, वृत्तें वगैरेंची पराकाष्ठेची भिन्नता पाहून तोहि फार वेळ टिकत नाहीं. अशा स्थितींत यशवन्तांनीं आपलें वाक्शस्त्र कोठल्या भट्टींत तयार केलें हा खरोखरच फार महत्त्वाचा प्रश्न वाटतो. आमच्या अल्प मतें तर नव्या जुन्या फारच थोड्या मराठी कवींच्या काव्यांत आमच्या या काळ्यासांवळ्या भाषेचें इतकें उजळ रूप पहावयास सांपडेल. एवंच यशवन्तांच्या भावी अभ्यासकास त्यांच्या भाषेची पूर्वतयारी ठरविणें हें एक दुर्घट व मनोरंजक काम वाटेल यांत शंका नाहीं.

अशा विपुल लोकप्रियतेच्या बुडाशीं असे लोकोत्तर गुण असणें साहजिक असलें तरी लोकप्रियता म्हणजे अधिकारी रसिकानें विचारपूर्वक दिलेलें मत मात्र नव्हे. सामान्य जनसमूहाचें मत एका विशिष्ट मर्यादेपर्यंत सावधगिरीनें पाऊल टाकतें, व एकदां ती मर्यादा ओलांडली म्हणजे अंधभक्तीस सुरुवात करतें. बिचाऱ्या लोकमतास स्वतंत्र विचाराचे श्रम फार वेळ सोसत नाहींत ! व एकदां डोळे झांकून घेतल्यावर त्यास सर्वच सारखें दिसूं लागतें ! पण जी डोळेझांक अल्प गुणांचे बाबतींत किफायतशीर ठरते तीच बहुगुणांचे ठिकाणीं हानिकारक होते. सामान्य लोक यशवन्तांच्या सर्वच कविता चांगल्या म्हणते तर फारसें बिघडलें नसतें. पण ते सर्वच कविता सारख्या समजतात आणि मग आपल्या स्थूल बुद्धीस झेंपतील अशा कविता विशेष प्रेमानें श्रवण करतात. आस्थेवाईक वाचकांची काय गोष्ट असेल ती असो; परंतु काव्यगायनाचा मजा लुटण्यास जमा झालेल्या श्रोत्यांची तर बहुधा अशीच स्थिति आढळते. 'आई' ही कविता म्हणजे यशवन्तांच्या करामतीची अखेर, तसेंच 'प्रतीक्षा' 'मातृपदा-विण' वगैरे कविता म्हणजे यशवन्तांच्या सर्वोत्कृष्ट कविता असाच निष्कर्ष श्रोत्यांच्या चर्येवरून काढावा लागेल. पण असें मत करून देण्यांत उपरिनिर्दिष्ट अंधभक्ति यशवन्तरावांचें नकळत नुकसानच करीत असते असें कोणाहि मर्मज्ञाचें समग्र यशोधन वाचल्यावर मत झाल्यावांचून रहाणार नाहीं. चाफळ-खेड्यांतील खराखुरा मानधन कवि

सहज होय तें । रुचिर रायतें
उरवितें न सेवितांहि विटुन जायतें !

यासारख्या घरगुती गाण्यांत सांपडणार नसून—

अनेक संक्रमणांनीं स्थितीस ये नवता
मतीस विस्मय देई तिची.अकल्पितता
नवीन आज गमे जें उद्यांस होई जुनें
परंतु रूप उद्यांचें न येई आकळतां ।
नभांत जो ध्वज डौलांत आज संचरतो ।
कशावरून उद्यां तो न व्हायचा कलता !
असेल आजि पताका धुळींत जी पडली
उद्यां बसेल दरारा तिचा न कां भंवता ?
झडून तीव्र हिमें वृक्ष वैभवा मुकला
*वसंत काय तरी दूर त्यास पालविता ?
मुळांत विश्वपसारा अणूअणूत फिरे
तदंगभूत पदार्थास कोठुनि स्थिरता ?
मना तरी नलगे खन्त अन्तरीं धरणें
प्रकाशतो फिरुनी अस्त जाहला सविता.

यासारख्या धीरगंभीर घोषणेंतच सांपडेल ! परंतु अप्रबुद्ध स्त्रीपुरुषश्रोत्यांस गुदगुल्या होण्यासारखें यांत कांहींच नसल्यामुळें ही कविता म्हणण्याचा कवीस क्वचितच आग्रह होतो !

यशवन्तांवर प्रतिकूल टीका फारशा झाल्या नाहींत हें खरें असलें तरी, जो एखादा प्रतिकूल सूर ऐकूं येतो त्यांतहि हाच आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ आढळतो. उदाहरणार्थ, यशवन्तांच्या कवितांत रेखाटलेली स्त्रियांची मनोरचना वस्तुस्थितीला धरून नाहीं अशी टीका एका स्त्री-लेखिकेनेंच केलेली आढळणांत आहे. आणि यशवन्तराव पुरुष असल्यामुळें या लेखिकेच्या मतास

*If Winter comes can Spring be far behind ?
Shelley

अर्थात्च अधिक मान मिळण्याचाहि संभव आहे ! तथापि वाटेल त्या स्त्रीस स्त्रियांची मनोरचना पुरुषाहून अधिक समजती तर तेवढया बाबतींत तरी प्रत्यक्ष शेक्स्पियर अथवा कालिदासहि यास एखाद्या आजकालच्या किरकोळ लेखिकेचाहि हात धरवला नसता ! पण अनुभव मात्र उलट आहे. प्रतिभावान् पुरुष अखिल स्त्रीजात जितकी पूर्णत्वानें आकलन करूं शकेल त्याच्या शतांशानें एखादी सामान्य स्त्री प्रत्यक्ष स्वतःचें मनहि जाणूं शकणार नाहीं, मग कवीनें काढलेल्या चित्रांतील दोष यथार्थ दाखविणें तर दूरच राहिलें. खेरीज कोणतीहि एक स्त्री स्त्रियांच्या सर्व अवस्था पूर्णत्वानें थोडीच अनुभविते ! पुढील चौकांतून सजून वाजतगाजत बाहेर पडणाऱ्या वरमायीस, अंधाऱ्या कोठींत चोवीस तास गाडून घेवून कुठल्या, कोणाच्या तरी मंगल कार्यांचे कष्ट करणाऱ्या विधवेची स्थिति कितपत माहीत असते ? 'मातृपदाविण' या कवितेंतील भाव पोरांच्या लटांबरामुळें तारांबळ उडालेल्या एखाद्या लेंकुरवाळीस अथवा चार दिवस उमेद असेपर्यंत जगांत चमकण्याची हौस पुरवून घेणाऱ्या एखाद्या पाश्चात्य Society woman ला कशी समजणार ? 'मातृपदाविण' अथवा इतर तत्सम टीकास्पद वाटलेल्या कविता सर्वांगसुंदर आहेत असा प्रस्तुत लेखकाचा अट्टाहास नाहीं— आणि तशी कोणती कविता असेल* ? तथापि यशवन्तांच्या 'प्रतीक्षा,' 'मातृपदाविण' यांसारख्या कवितांत मनोरचनेच्या दृष्टीनें कोणाहि शिकलेल्या स्त्रीनें जातां जातां दाखवून द्यावें असें दोष आहेतसे वाटत नाहीं.

आतां यशवन्तांसारख्या आत्मनिष्ठ कवीची परमनोगत (Objective) चित्रें आत्मपर चित्रांइतकीं रम्य वाटणार नाहींत हें वर आत्मनिष्ठेच्या केलेल्या मीमांसेवरून कोणच्याहि ध्यानांत येईल. तथापि परप्रान्तांत पाऊल टाकतांना वाटणारा अवघडपणा यशवन्तरावांच्या भाषेच्या सार्वत्रिक मोहनीमुळें

---

* बायरन् आपल्या प्रकाशकास एका पत्रांत लिहितो— "You say that one-half is very good; you are wrong! For if it were, it would be the finest poem in existence. Where is the poetry of which one-half is good?"

Byron's Letters.

सहजच झांकला जातो. याचीं उत्कृष्ट उदाहरणें पहाणें असल्यास यशवन्तांच्या ग्रामगीतांत सांपडतील. यशवन्तांसारखा स्वतःच्या सुखदुःखांत व 'माना-पमानां' त गढलेला कवि

शिण जाईल न्यारि करून। अन् सांग कुणा देखुन।
त्यें खुलें तोंड घामानं। भरघोसहि कणसाहुन

तसेंच

हें घालुन त्याला पाहिन डोळे भरूनी
मग खुशाल तिरडी बांधा माझी कोणी।

अशा उद्गारांत शेतकऱ्यांच्या भावनांशीं तद्रूप झालेला दिसतो, व या-वरूनच आत्मनिष्ठेची प्रियशृंखला तोडून प्रसंगविशेषीं परकायाप्रवेश करूं शकतो यांत शंका नाहीं. पण किती केलें तरी तो परकायाप्रवेशच होय! प्रसिद्ध स्कॉटिश् कृषीवल–कवि रॉबर्ट बर्न्स् याचेप्रमाणें रा. यशवन्त यांनीं स्वकाया कृषिकर्मांत झिजविलेली नाहीं, व त्यांचें मनहि बर्न्स्प्रमाणें वावरांतील कोकरांत वावरत नसून तें वर्षांतून बहुतेक महिने उच्चवर्णीय सुसंस्कृत महाराष्ट्रांतच वावरत असावें असें त्यांच्या काव्यावरून वाटतें. सुसंस्कृत कवींनीं कितीहि रम्य कृषीवलगीतें लिहिलीं तरी प्रत्यक्ष शेतकऱ्यांतून एखादा कवि निर्माण होणें ही त्याहूनहि आणिक गोष्ट आहे याचा विसर उत्साही टीकाकार व यशवन्तांच्या कुणाबाऊ गाण्यांचें त्वरित अनुकरण करणारे तरुण कवी यांस पुष्कळदां पडलेला दिसतो.

यशवन्तांचें जनतेसमोर असलेलें काव्य विपुल असलें तरी त्यांचें तारुण्य लक्षांत घेतां तें त्यांच्या संपूर्ण काव्याविष्काराचा एक अल्पविभाग म्हटलें पाहिजे. अशा स्थितींत त्यांतून 'संदेश' हुडकून काढणें निष्फळ होईल. त्यांतून ज्यांनीं त्यांची अद्भूतरम्य 'बंदिशाला' ही पाहिली असेल त्यांस तर या बाबतींत विशेषच अडचण भासेल. यशवन्तांचीं आजवर प्रसिद्ध झालेलीं विपुल भावगीतें व 'बन्दिशाले'सारखें दीर्घ काव्य येवढी जनतेच्या नजरेसमोर आल्यावर अर्थातच त्यांच्या काव्यांतून आजच्याहून अधिक स्पष्ट संदेश ऐकूं येईल; आज त्यांच्या विविध वृत्तींच्या गीतांतून ऐकूं येणारे वेगवेगळे

सूर एका गंभीर तत्त्वज्ञानांत विलीन होत आहेतसें दिसेल; आज जागजागीं आढळणाऱ्या निराशेच्या सुरांस श्रद्धेचा पैलतीर असलेला आढळून येईल व आज जागजागीं उन्नत मस्तकानें वावरणारी आत्मनिष्ठा केवळ आत्मगौरवार्थ नसून इतरांसहि आशा देऊन धीट बनवीत आहे असें दिसेल. तरी आज प्रकट झालेल्या यशवन्तांच्या काव्यवाणीनें तरूणांसच काय पण वृद्धांसहि ( शारीरिक वा बौद्धिक वृद्धांस ! ) आपले वैशिष्ट्य कबूल करावयास लाविलें आहे यांत शंका नाहीं. रविकिरण मंडळाच्या इतर सभासदांबरोबर रा. यशवन्त यांसहि वृद्धांचें बोलणें खावें लागलें, त्यास अद्याप पुरीं सातआठहि वर्षें लोटलीं नाहींत. या कालकृत वृद्धांची री ओढण्यांत त्यांच्या पुण्याईचा अर्धा वांटा लाभेल अशा आशेनें आपली तुटपुंजी पुण्याई खर्चीं घालणारे अकाली वृद्ध तेव्हांहि होते व आजहि असतील. तथापि पुनर्विवाहित स्त्री पाहून बिचकणाऱ्या ' बालबोध ' स्त्रीप्रमाणें एके काळीं रविकिरणास बिचकणाऱ्या सोंवळे टीकाकारहि द्वारेंहि आज यशवन्तांचें स्वागत करीत आहेत. एखाद्या अंधारकोठडींत प्रवेश मिळाल्याने किरणांची किंमत थोडीच वाढणार आहे ? वाढली तर अंधारकोठडीचीच वाढणार. वाढली तर म्हणण्याचे कारण हे ' साधल्याचे सोबती,' काव्याचे ज्ञाते कीं यशाभोंवतीं गोळा होणारे मुंगळे हा एक प्रश्नच असतो ! असो. यशोदेवतेच्या गाभाऱ्यांत सर्वच खरे भक्त असतहि नाहींत, असण्याची जरूरीहि नाहीं. पण त्यांतहि यशवन्तांच्या भाग्याचें उपरिनिर्दिष्ट वैशिष्ट्यच दिसून येत नाहीं काय ? कित्येक दुर्दैवी कवींस ' कीर्तीचा स्वर्ग ' मेल्याशिवाय दिसत नाहीं. कित्येक हीनभाग्य कवींस गांवढळ स्तुतिपाठक जिवन्तपणींच कीर्तीच्या तख्तावर चढवितात न चढवितात तोंच ते स्वतःच्या व स्वभक्तांच्या क्षीण पुण्यामुळें खालीं गडगडतात. तर कित्येकांस यथाकाल भल्याबुऱ्यांची भलाई लाभूनहि अकारण शत्रूंचा शनि टळत नाहीं. पण यशवन्तरावांस ऐन तारुण्यांत निष्कंटक यशोभूमीवर संचरण्यांस सांपडत आहे हेंच त्यांच्या ' यशवंत 'त्वाचें लक्षण नव्हे काय ? आम्हां क्षुधित रसिकांस दोन वेळ ' यशोधन ' देऊन यशवन्तरावांनीं ऋणी करून ठेवलें आहे. त्यांचें ऋण त्वरित फेडून त्यांच्या 'बन्दिशाले' चा दरवाजा खुला करणें हें आतां आपलें काम आहे.

# आजकालचें नाट्यवाङ्मय

( प्रस्तुतवाङ्मय समालोचन १९३४ मध्यें तयार होत असलेल्या लोकशिक्षणाच्या विशेष अंकाकरितां लिहिलें होतें. )

या लहानशा समालोचनांत साद्यंत चर्चेची अथवा समग्र सूचीची अपेक्षा करतां येणार नाहीं. तसेंच वाङ्मयाच्या दीर्घ प्रवाहांतील एकदोन वर्षां-एवढा लहानसा कालखंड घेऊन त्याचें स्वरूप दाखवितांना थोड्या मागील कालाशींहि संबंध येणें अपरिहार्य आहे. म्हणून प्रस्तुत संक्षिप्त समालोचनांत अलीकडील नाट्यवाङ्मयांतील विशेषांचें गेल्या वर्षांत कोणतें स्वरूप निश्चित झालें याचें स्थूल दिग्दर्शन करण्याचें योजिलें आहे.

वाङ्मयांतहि मागणीचा पुरवठ्यावर संख्येच्या दृष्टीनेंच नव्हे तर गुणांच्या दृष्टीनेंहि परिणाम होतो. वाङ्मयाच्या इतर शाखांहून नाट्यशाखा बहुजन-समाजाशीं अधिक निगडित असल्यामुळें या प्रांतांत बदललेल्या अभिरुचीचीं प्रतिबिंबें अधिक त्वरित दिसूं लागतात. मूक चित्रपट ' वाचाळ ' झाल्याला बरेच दिवस झाले असले, तरी गेल्या चारदोन वर्षांतच त्याचा आपल्याकडे कल्पनातीत प्रसार झाला. याचे तात्कालिक परिणाम म्हणजे लोकांस नाटका-हून वेळ व द्रव्य यांचा कमी खर्च पाडणारी करमणूक आवडूं लागली; आणि चित्रपटांतील नटींचे अभिनय पाहून स्त्रियांचीं कामें स्त्रियांनीं करण्याविषयीं आवड उत्पन्न झाली व शक्यता पटूं लागली.

या अपेक्षाकालाचा फायदा घेऊन कित्येक नाट्यभक्तांनीं युरोपांतील नवीन धर्तीचीं नाटकें लोकांपुढें आणण्यास प्रारंभ केला. ज्यास आधुनिक

नाट्यतंत्र हें नांव देण्यांत येत आहे, त्यास अनुसरून लिहिलेल्या नाटकांनीं वर सांगितलेल्या कांहीं अपेक्षा सहजच तृप्त केल्या. विशेषत: लहान नाटकें आणि स्त्री-नटींची योजना हे प्रकार अधिक प्रमाणांत दिसूं लागले. या बाबतींतील विशेष प्रयत्न म्हणजे ' नाटयमन्वंतर ' नामक नाटक मंडळीनें केलेले प्रयोग. या मंडळीनें ' आंधळ्याची शाळा '. या रूपांतरित नाटका-पासून सुरुवात करून ' लपंडाव ' ' उसना नवरा ' ' तक्षिला ' हीं नाटकें रंगभूमीवर आणिलीं. यांतील ' उसना नवरा ' आणि ' आंधळ्यांची शाळा ' ही नाटकें विशेष लोकप्रिय झालीं. हीं दोन्ही रूपांतरेंच असल्यामुळें युरोप-अमेरिकेंतील रंगभूमीवर मराठी भाषा योजिल्यासारखीं भासतात. कां कीं त्यांतील समाजचित्रें आपणांस सर्वस्वीं परकीय आहेत. अर्थात् इंग्रजी भाषा, इंग्रजांचे बोबडे उच्चार, व हजारों मैलांवरील लोकांच्या चाली आणि नखरे ( fashions ) यांनीं भरून गेलेले चित्रपट बिनतक्रार पाह-णाऱ्या हल्लींच्या प्रेक्षकांस हीं नाटकें फारशीं विलक्षण वाटलीं नाहींत. तथापि मराठी नाटकांचें हें नवीन स्वरूप ठरलें असें म्हणतां येणार नाहीं.

आर्थिक व इतर अनेक कारणांनीं गंधर्व नाटक मंडळी, बलवंत नाटक मंडळी यांसारख्या प्रसिद्ध नाटक मंडळ्यांनीं आपला कारभार आटोपल्याचें अथवा आटोपणार असल्याचें जाहीर केलें; याच सुमारास सुशिक्षित नटी, नवीन तऱ्हा व विपुल प्रसिद्धिसाधनें यांनीं नव्या इंग्रजी नाटकांच्या रूपांत-रांचा बराच बोलबाला झाला. यामुळें पूर्वींचीं नाटकें जाऊन नवीन नाटकें आलीं, असा आभास उत्पन्न झाला. तथापि वाङ्मय या दृष्टीनें पाहणाऱ्यास या बाजारी गडबडीमुळें चिरकालीन वाङ्मयप्रवाहावर कितपत फरक झाला हें ठरविलें पाहिजे. आणि या दृष्टीनें पाहतां जुन्या पद्धतीनें लिहिलीं जाणारीं नाटकें अद्यापि निघत आहेत व तीं उपेक्षणीय नाहींत. तसेंच नव्या पद्ध-तीचीं म्हणून गाजलेलीं नाटकें अन्तर्बाह्य परकीय आणि केवळ रूपांतरित आहेत, असें दिसून येईल. यांतील दुसऱ्या प्रकारच्या नाटकांचा वर निर्देश झालाच आहे; व पहिल्या प्रकारचीं म्हणजे उघड उघड जुन्या वळणाचीं पण अनुपेक्षणीय अशीं नाटकें म्हणजे दे. भ. विनायकराव सावरकर व विद्वद्वर्य चिंतामणराव वैद्य यांचीं होत.

बहुतेक वाचकांस या दोन प्रसिद्ध पुरुषांनीं नाटकें लिहिलीं आहेत, ही एक अद्‌भुत वार्ताच वाटेल. कारण, त्यांच्या नाटकांचा फारसा गाजावाजा झालेला नाहीं. श्री. सावरकर यांचें 'उत्तरक्रिया' हें नाटक त्यांच्या प्रखर बुद्धिवादाचेंच द्योतक आहे. पानिपतच्या दीर्घपरिणामी संग्रामानंतरच्या कालाचें चित्र रेखाटण्याच्या निमित्तानें सावरकर यांनीं आपल्या ओजस्वी भाषेत हिंदूंच्या अनेक दोषांचें विदारण केलें आहे. श्री. चिंतामणराव वैद्य यांची 'संयोगिता' म्हणजे त्यांच्या रसाळ भाषेचा, विशाल विद्येचा आणि परिपक्व वयाचा सहज विलास वाटतो. श्रीमंत शिंदे सरकार यांच्या मनीषेवरून लिहिलें गेलेलें हें नाटक पूर्व परंपरेनुरुप सूत्रधार व नटी प्रेक्षकांस सादर करितात. भरतवाक्यांत भारतवर्षांतील स्त्रियांत पतिनिष्ठा वाढो, असें प्रार्थिलें आहे. नाटक नव्या धर्तीचें नाहीं याचे इतके पुरावे पुरे आहेत.

या दोन अतिरेकाच्या मध्यभागीं उभ्या असलेल्या दोन प्रसिद्ध लेखकांचीं नाटकें अर्थातच आजच्या वाङ्मयाचीं अधिक प्रातिनिधिक होत. हे ग्रंथकार म्हणजे मुंबईचे श्री. भा. वि वरेरकर व पुण्याचे श्री. प्र. के. अत्रे. श्री. वरेरकर आपल्या शीघ्रगतीनें नाट्यप्रांत अधिकाधिक काबीज करीत आहेत, तर श्री. अत्रे यांनीं 'साष्टांग नमस्कारा'च्या मागोमाग 'घराबाहेर' हें सुंदर नाटक लिहून लोकांत नाटयप्रांतांतील आपल्या भावी यशाविषयीं अधिक आशा उत्पन्न केली आहे. वरेरकर, समाजांतील आर्थिक, सामाजिक वगैरे अनेक प्रश्नांवर आपल्या यशस्वी नाटयकृतींनीं प्रकाश पाडीत आले आहेत. 'जागती ज्योत' हें त्यांचें अलीकडील नाटक याच परंपरेंतील आहे.

या सुप्रसिद्ध जुन्यानव्या नाटयलेखकांखेरीज कांहीं हौशी नाटयसमाजांनींहि नव्या पद्धतीचीं चुरचुरीत ( light ) नाटकें रंगभूमीवर लोकप्रिय केलीं. यांत, 'बबी,' 'बुवा' वगैरे नाटकांचा निर्देश करावा लागेल. या मंडळींनीं जुनी भारदस्त तऱ्हा पार झुगारून दिली व नव्या तत्रांचेंहि फारसें स्तोम केलें नाहीं.

यांखेरीज प्रो. फडके, नारायणराव कुलकर्णी, शुक्ल, देसाई, औंधकर,

ठाकरे, बामणगांवकर वगैरे सुपरिचित लेखकांचीं अलीकडील नाटकें त्यांच्यासंबंधींच्या अपेक्षा पुऱ्या करणारीं आहेत. स्त्रियांनीं रंगभूमीवर पदन्यास केला असला तरी नाटयवाङ्मयांत त्यांचा अद्याप फारसा वावर नाहीं. या दृष्टीनें सौ० इंदिराबाई पेंडसे या लेखिकेचें '**कुलभूषण**' नामक नाट्यापत्यासह स्वागत करणें जरूर आहे.

'आधुनिक नाटयतंत्र' या शब्दांचा उच्चार अनेक वेळ ऐकूं येत असला तरी त्यांच्या लक्षणासंबंधीं, गाजलेल्या लेखकांसहि योग्य कल्पना दिसत नाहीं टेलिफोन, रेडिओ यांचा उल्लेख, नटांचे युरोपियन् तऱ्हेचे पोषाख, अंकांचे प्रवेश न पाडणें वगैरे म्हणजे नवें नाटय, अशी चांगल्या चांगल्यांची देखील कल्पना दिसते ! लांबलचक वर्णनामुळें जुन्या कादंबऱ्यास कंटाळणारी मंडळी मात्र प्रयोगोप्रयोगी सूचना (Stage directinons) दोन दोन पानें देऊं लागलीं आहेत ! आधुनिक नाटयाचीं प्राणभूत लक्षणें मात्र अद्याप रंगभूमीवर दिसूं लागलीं नाहींत; फार काय नाटयचर्चाकारांनीं त्यांचें अद्याप यथार्थ विधानहि केलेलें नाहीं. या दृष्टीनें श्री. वि. चिं. बेडेकर, एम्. ए. एल्एल्. बी. यांचें '**ब्रह्मकुमारी**' हें नाटक अत्यंत वाचनीय आहे. प्रस्तुत एकाच नाटकांत इब्सेन, शॉ, वगैरे युरोपीय विचारप्रवर्तक नाटयलेखकांचा योग्य ठसा दिसून येतो. विचार, त्यांचे प्रवर्तन करण्याची पद्धति, व नाटय-चातुर्य या दृष्टीनें प्रस्तुत नाटक इतर मराठी नाटकांहून सर्वस्वीं भिन्न म्हणून जाणवल्याखेरीज राहत नाहीं ? तथापि त्याचा प्रचलित नाट्यचर्चेंत बेताचाच उल्लेख झाला; व जो झाला त्यांत त्याच्या विशेषांची अभिज्ञता दिसून आली नाहीं. यावरून खऱ्या प्रभावी अभिनव नाटयकलेची महाराष्ट्रास ओळख अथवा आवडहि नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं.

केवळ बाह्यांगावरून आधुनिकत्व न ठरविणाऱ्यांस सावरकाराच्या नाटकांतहि आधुनिक पाश्चात्य नाटकांचे प्रमुख गुण आढळतील, शिवाय श्री. 'किरात' यांसारख्या वयोवृद्ध नाटककारांनीं तर प्राचीन संस्कृत नाटय-कलेंत देखील आधुनिक समजले जाणारे कित्येक नाटयप्रकार योग्य प्रसंगीं कसे योजण्यांत आले आहेत, तें ओळखलें आहे व तें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

'किरात,' सावरकर बेडेकर यांसारख्यांनीं ग्रहण केलेलीं आधुनिक नाट्यशास्त्राचीं खरीं मर्में सध्यांच्या हंगामी व जाहिराती लिखाणांच्या युगांत बहुजनसमाजापुढें मांडलीं जात नाहींत; तरी जुन्या नव्या विषयींचीं सध्यांचीं मतें पुढील कांहीं वर्षांत अनुभवानें दुरुस्त झालेलीं दिसतील अशी आशा आहे.*

*तीन वर्षांपूर्वीं लिहिलेल्या या लेखांतील रंगभूमीविषयक व नाट्यतंत्र-विषयक विधानें खरीं ठरल्याचें सहज ध्यानांत येईल. केवळ नाविन्यामुळें श्रेष्ठता पावलेल्या कित्येक प्रकारांस त्यांच्या जनकांनींच ( अथवा दत्तक पित्यांनीं ! ) परत पोटांत घेतलें आहे. भाषांतरांच्या विभागांत मात्र सौ. शकुंतलाबाई परांजपे यांच्या दोन नाटिकांनीं अभिनंदनीय भर घातली आहे. " आंधळ्यांची शाळा " यासारख्या रूपांतरित नाटकांतील परदेशी वातावरणासंबंधीं वरील लेखांत केलेलीं विधानें सौ. शकुंतलाबाईंच्या सुंदर नाट्यापत्यांनीं अर्थातच खोटीं पाडलीं आहेत.

# खरी भाषाशुद्धि आणि तिचे खरे वैरी

आपली मराठी भाषा अशुद्ध होत चालली आहे व ती शुद्ध राखण्याकरितां फारशी व इंग्रजी शद्बांना वाळीत टाकावें असा प्रचार बॅ. सावरकर आणि प्रो. पटवर्धन हे दोन पराक्रमी विचाराग्रणी व वाङ्मयसेवक सध्यां फार जोरांत करीत आहेत. या चळवळीचें मूळ कोणतें, या दोन वीरांच्या विचारांतून कोणते सिद्धांत आणि उपसिद्धांत उगम पावतात आणि या झुंझारांच्या अनुयायी सैन्याकडून व बाजारबुणग्यांकडून कशा प्रकारची जाळपोळ होत आहे याचा विचार माझ्यासारख्या तटस्थ लेखकासहि करण्यावांचून गत्यंतर उरलें नाहीं.

पहिली गोष्ट म्हणजे कोणत्याहि देशाच्या भाषेचा परदेशच्या भाषांशीं ऐतिहासिक व भौगोलिक कारणांनीं संबंध आल्याखेरीज राहत नाही. अशा संबधांनीं ज्या भाषेच्या प्रकृतीवर कायमचे परिणाम झाले नाहीत अशी भाषा अर्वाचीन काळांत दुर्मिळ. आपल्या प्राचीन संस्कृत भाषेच्या घटनेंत व वाङ्मयांत अनेक दुर्मिळ विशेष आढळतात, त्यांतच असामान्य शुद्धत्व हाहि एक आढळेल. संस्कृत भाषेनें आपल्या सहस्रावधि आयुर्मर्यादेंत कांहीं अनार्य शद्ब पचविले कीं नाहीं हा प्रश्न आपण शास्त्रज्ञांवर सोपवूं. परंतु इतपत निर्लेपत्व अर्वाचीन युगांत राखणें दुर्घटच नव्हे तर रोगटपणाचेंहि ठरेल, असें म्हणण्यास हरकत नाहीं. देवाब्राह्मणांची म्हणून एक वेगळी "गीर्वाणवाणी" जतन करणें शक्य आहे व कांहीं दृष्टीनीं फायद्याचेंहि आहे. परंतु नित्य व्यवहारांतील, बाजारांतील, कचेऱ्यांतील, आगगाड्यांनीं सुलभ करून सोडलेल्या प्रांतोप्रांतींच्या प्रवासांतील, भाषा शुद्ध राखणें किंवपत शक्य

आहे हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. प्रचारार्थ ज्यास शीर तळहातावर घ्यावें लागलेलें नाहीं आणि म्हणूनच ज्याचें शीर अद्याप खांद्यांवर कायम करीत आहे अशा मजसारख्या मनुष्यास सध्यां भाषेची अशुद्धता ( निदान सावरकर–पटवर्धनांच्या अर्थानें तरी ) व्यथित करीत नाहीं. उलट हा शुद्धि-प्रचार मात्र चिंतास्पद आणि भयावह वाटत आहे. अशा स्थितींत या खाजवून काढलेल्या विकाराची आणि त्याबरोबरच बळावलेल्या अकारण दुर्बोध व विद्रूप शद्वनिर्मितीच्या भीषण रोगाची या लेखांत यथामति चिकित्सा करणें जरूर आहे.

शुद्धिवाले लोक स्वतःस स्वाभिमानी समजतात व शिवाजी महाराजांनीं जें केलें तेंच आम्ही करीत आहों असेंहि म्हणतात. या जहाल व अत्याग्रही प्रचारकांच्या सांगोपांग विधानांची तर्क–शुद्ध छाननी करूं गेल्यास एका लेखावर भागणार नाहीं. तथापि त्यांच्या विधानांतील ध्वनींचा योग्य परामर्ष घेतला पाहिजे. गेल्या पिढींत कृष्णशास्त्री, विष्णुशास्त्री ज्या स्वरूपाची भाषा लिहीत आणि त्यानंतरच्या पिढींत टिळक व केळकर यांनीं ज्या प्रकारचें गद्य लिहिलें तें गद्य शिवाजीमहाराज पाहते तर त्यांनीं 'राजव्यवहारकोशाची' यातायात घेतली असती असें प्रस्तुत लेखकास वाटत नाहीं. महाराजांच्या काळीं विशेषेंकरून कागदोपत्रींच्या व दरबारच्या भाषेंत इतका परकीपणा भरला होता कीं, तो कोणासहि असह्यच झाला असता. खुद्द शिवाजी महाराजांनीं लिहविलेल्या आज्ञार्थी पत्रांत जितके अपरिचित फारशी शब्द आढळतात तितके आजचा अशुद्धांतील अशुद्ध लेखकहि वापरूं शकत नाहीं. इतकें कशाला ? तत्कालीन कागदपत्रांत जितके दुर्बोध शब्द आढळतात तितके सावरकर–पटवर्धनांच्या शुद्धीच्या आवेगानें व नवनिर्मितीच्या वेडानें दुर्बोध झालेल्या आजकालच्या लिखाणांतहि आढळणार नाहींत ! शिवाय महाराजांस स्वपराक्रमानें व भवानीच्या प्रसादानें हातीं आलेल्या राज्ययंत्राच्या द्वारें नवीन संस्थांचें व नवीन युगाचें तोरण बांधावयाचें होतें. अशा वेळीं यवनांच्या दरबारांतील संज्ञा चालू ठेवणें राष्ट्रीय दृष्टीचा पूर्ण अभाव असल्याखेरीज झालेंच नसतें. उलट सर्व राज्यकारभार यवनांच्या हातीं असतां व त्यांच्या ओंजळीनें पाणी पीत असतां त्या वेळच्या एखाद्या भाषापंडितानें केवळ शब्दांची चळवळ काढली

असती तर तें किती हास्यास्पद झालें असतें, हाहि विचार करण्यासारखाच प्रश्न आहे.

आजचे आमचे भाषापंडित अशा थाटांत नवीन नवीन संज्ञांची—इतकेंच काय पण " राव महाशय " यासारख्या हास्यास्पद किताबांची—खैरात चालवीत आहेत कीं, जणुं काय आजच्या फर्मानांतील शब्द उद्याच्या कोशांत वज्रलेपच होणार आहेत ! याचा उपयोग कितीसा होईल ?... परिणाम कोणत्या रीतीचा होईल ?... प्रश्न विचार करण्यासारखा आहे.

पण या वाग्भटांनीं उपदेशिलेल्या औषधयोजनेपेक्षां रोगनिदानाचाच तूर्त थोडा अधिक विचार करूं. मागें सांगितलेंच आहे कीं, चिपळूणकर, टिळक यांनीं मान्य केलेला शब्दसंग्रह आजच्या भाषाशुद्धिकर्त्यांना अराष्ट्रीय आणि दास्यवृत्तीचा वाटत आहे. प्रो. पटवर्धन यांस तर आपणच सात आठ वर्षांपूर्वी वापरलेला शब्दसंग्रह अशुद्ध व दास्यनिदर्शक वाटत आहे! पण याहिपेक्षां एका अत्यंत क्षुल्लक व उपेक्षणीय परिस्थितीचा या मंडळींनीं केवढा बाऊ केला आहे हें पाहण्यासारखें आहे. वर्षानुवर्षे इंग्रजीला तनमनधन अर्पण करणाऱ्या हिंदी समाजांतील दोन व्यक्ति खाजगी संभाषण करीत असतां जर " आपल्या ' वाइफूची ' प्रकृति कशी आहे " ? यासारखें कांहीं म्हणतील तर सावरकर यांस त्या व्यक्ति अहमदशहा अबदालीस, महंमद घोरी, बाबर, यांसारख्या स्वातंत्र्यभक्षक व्यक्तींस आवाहन करीत आहेत असें वाटतें. हा शुद्ध पोरकट दुराग्रह आहे—नव्हे, हा शुद्ध महंमद तघलकाच्या जातीचा वेडगळ जुलूम आहे. उद्यां डोक्यावरील इंग्रजी खांद्याघर येऊं द्या कीं, शेकडा पन्नास माणसांवरील इंग्रजीचें किटण आपोआप उतरूं लागेल. आणि परवा देश स्वतंत्र होऊं द्या कीं, लोक पोस्टला डाकघर आणि लायब्ररीला ग्रंथशाळा नाहींतर असेंच कांहीं तरी सहज म्हणूं लागतील. पण मुसलमानांच्या भटारखान्यांत नोकरी करीत असलेल्या दुर्दैवी मनुष्यास मांसस्पर्श करण्याबद्दलहि शिव्याशाप देणें खरोखर अमानुष होय. बरें, साध्या व्यवहारांत येणारे शब्द कां व कसे येतात, याचा यांनीं सहानुभूतीनें व मानसशास्त्रदृष्ट्या विचार केला आहे काय ? जो मनुष्य बोलतांना ' माझी वाइफ् '

म्हणतो तो दुसरे दिवशीं एखादें पत्र लिहितांना ' वाइफला फीवर आला होता ' असें लिहितो काय ? सावरकर—पटवर्धनांचें नांवहि माहीत नसलेला मनुष्यदेखील लिहितांना सावध व जबाबदार असतो. उलट जन्मभर खाजगी पत्रव्यवहार इंग्रजींत करणारे, आणि शुद्धीचें नांवहि न काढणारे विष्णुशास्त्री, लोकमान्य टिळक, कविवर्य तांबे यांसारखे लेखक जिवन्त व जातिवंत मराठी वाङ्मय निर्माण करूं शकतात.

जातिवंत मराठी कोणतें याचेंहि या भाषाशुद्धीच्या वावटळींत निश्चित अवधान ठेविलें पाहिजे. लोकहितवादी, लो. टिळक यांसारखे तीव्र बुद्धीचे व आवेशानें लिहिणारे लेखक जी भाषा लिहीत, हरीभाऊ आपटे, धनुर्धारी यांसारखे महाराष्ट्राचा भूतकाल व वर्तमान, प्रतिभेनें आकलणारे व चितारणारे सहृदय लेखक जी भाषा लिहून गेले, व आजमितीस चंद्रशेखर, तांबे यांसारखे कवि, केळकर, माडखोलकर, अत्रे यांसारखे प्रसन्न गद्य लिहिणारे मार्मिक लेखक जी भाषा लिहितात, ती जातिवंत म्हणण्यास कांहींहि प्रत्यवाय नाहीं. उलट सावरकर, पटवर्धन यांसारखे पंथाग्रही व लहरी लेखक जी कमालीची कृत्रिम भाषा लिहीत आहेत व प्रत्यहीं बदलून विद्रूप करीत आहेत ती भाषा जातिभ्रष्ट आहे. सावरकरांचा परवाचा प्रतिभेंतील याच विषयावरील लेख पाहा. " तदर्थक स्वकीय नी सुरेख शब्द......नष्टवूं देत आहोंत. " " .........प्रगत लिपी हें ज्यांचें पैतृक निजस्व आहे. " " त्यांचीं नांवें स्वागतिण्यास तें आंदोलन सज्ज असतें " इत्यादि इत्यादि. अशी भाषा तर हे पुढारीच वापरीत आहेत. आणि कसली तरी टूम घट्ट धरून स्वर्ग चढूं पाहणारे गांवोगांवचे अनुकरणप्रिय बेजबाबदार लेखक तर याच प्रमाणांत किती खून करीत आहेत ते दैनिकांतून आणि साप्ताहिकांतून रकाने भरभरून दिसतच आहे. या प्रत्येक शब्दागणिक एक एक प्रबळ सावरकरी कारण आहे हें प्रस्तुत लेखक जाणून आहे. " नि " हें कोंकणी बोलीतील तुटकें अव्यय सावरकरांच्या भरजरी भाषेंत कां " स्वागतिलें " गेलें असावें ? आणि सुमारें दहाबारा वर्षांमागील " हरीजी " " बुतफरोशी " वगैरे बोकडघास गिळणारी माधव जुलियनी कविता " अन् " यासारखें घरगुती देशस्थी अव्यय आपल्या पङ्गतींत पावन कां समजूं लागली !...

दोघांचीं कारणें दोघांसच माहीत. आपण तूर्त असें समजूं या कीं, रा. सावरकर यांस " व " हें मराठी वाक्यांच्या पोटांत शिरलेलें मुसल्मानी पिलूं " नी "च्या आटोपशीर कट्यारीनें काटून टाकावयाचें होतें. आणि आपले मांसावलिप्त हात धुवून अलीकडेच शुद्धीमागें लागलेल्या "माधव जुलियन्" नामक विप्रविशेषास "अन्" मध्येंहि कांहीं भाषापौष्टिक द्रव्य आढळलें असेल. पण इतक्या विक्षिप्त गद्य–पद्य भाषा लिहिणारांचे भाषाशुद्धीबाबतचे आदेश स्वीकारण्याइतकें वाङ्मयक्षेत्र आज निर्वीर झालें आहे काय ? पटवर्धनाचे कांहीं गद्यप्रयोग पहा..." प्रभूला चोराविरुद्ध आपलें प्रभुत्व सिद्ध करावें लागतें. " " ग्रीकांची स्वारी या स्थानीं ग्रीकांचें परचक्र असें कां नाहीं ? " ":मराठी शब्दांना येत चाललेली ही मृत्युकळा "...वगैरे वगैरे.

वाचकांना फिरून सांगितलें पाहिजे कीं, एकहि परकी शब्द वापरावयाचा नाहीं म्हटलें तरी सावरकर व पटवर्धन यांसारखें दुर्बोध व विद्रूप लिहिण्याची जरूरी नाहीं. सावरकर व पटवर्धन यांच्या प्रचंड लिखाणांतून याहून किती तरी भयंकर अत्याचार निवडतां येतील. मी फक्त त्यांच्या परवाच्या लेखांतून—ते सहज माझ्या समोर असल्यामुळें—चारदोन मासले उचलले आहेत. पटवर्धनांच्या कांहीं काव्यपंक्ति पहा.

" व्हाया पास कितीकदा नवस मीं केले तिथें शैशवीं "

*　　　　*　　　　*

" जोरानें बसतां सुरुंग–धबका अदृश्य हो जीवन "

*　　　　*　　　　*

" भिन्तीला दिसतात दोनच मला त्या टांगल्या तस्विरी "

किती निवडाव्या ? सर्वच अशा आहेत कीं ज्या भाषेंत काव्य देखील इतपतच कर्णमधुर त्या भाषेला भविष्यच नाहीं असें कोणीहि म्हणावें ! पण हे पटवर्धनांच्या माजी अवस्थेंतील मासले आहेत. त्यावेळीं त्यांस त्यांचें सध्याचें अवतारकार्य दिसलें नव्हतें. त्यावेळचे त्यांचे विचार व त्या वेळच्या तत्त्वानुसार झालेली त्यांची सजावट मनोरंजक होईल म्हणून पुढें शब्दशः उतरतों.

त्यावेळचे पटवर्धन म्हणतात " पूर्वाश्रमींचे फारशी अरबीच काय पण अनेक बारमासे मराठी शब्दांना सुद्धा सोवळ्या दास्यवृत्ति टीकाकारांनी ( दास्यवृत्तीची व्याख्या १९२७ सालच्या फरमानाप्रमाणें ! १९३५ च्या फतव्याप्रमाणें नव्हे ! ) प्रतिष्ठित पद्यांत मज्जाव केलेला आहे. या जुलमी सुलतानीचा निषेध म्हणूनच..." इ. १९२७ चे पटवर्धन पुढें म्हणतात " आमचें या बाबतींतील धोरण पुढीलप्रमाणें आहे. हा शब्द पूर्वाश्रमीं कोठीलहि असला तरी आमच्या बहुजनसमाजानें एकदा त्याला पङ्क्तिपावन करून घेतला कीं, तो मराठी झाला. त्याची जात सुटली. नंतर त्याला दूर ठेवणें अन्यायाचें आहे."

आतांपर्यंत घेतलेल्या अवतरणांत सावरकर व पटवर्धन यांच्या अत्यंत अस्वाभाविक व क्लिष्ट भाषेचें स्वरूप आलेंच आहे व हेंहि निर्दिष्ट केलें गेलें आहे कीं, त्यांची क्लिष्टता त्यांच्या भाषाशुद्धीच्या कल्पनेप्रमाणेंहि जरूर नाहीं. त्यांच्या व विशेषें करून सावरकरांच्या भाषेसंबंधीं आणखी एक गोष्ट सांगितली म्हणजे त्यांच्या सोवळ्या भाषेचें पूर्ण दिग्दर्शन झालें. ती गोष्ट म्हणजे ते चिरपरिचित परकीय शब्दांचें शुद्धीखातर बोजड भाषांतर करतात! रूढ स्वकीय शब्दांची अवहेलना करून आपल्या सुलतानी टांकसाळींतून नवीन विकृत शब्द सोडतात. ( उ. मथळा हा शब्द शुद्ध मराठी असूनहि त्यास शीर्षक हा शब्द अधिक पसंत होतो.—) आणि इतकें करून शिवाय ढळढळीत फारशी व इंग्रजी शब्दहि ते वापतात! उपरिनिर्दिष्ट शुद्धि—प्रचारक लेखांतीलच त्यांचे प्रयोग पहाः—

" बिनीवर झुंजणारे लोक " " शेवटीं एका वर्षाचे आंत साऱ्या **सरकारी** कार्यालयांत निर्भेळ तुर्कीच वापरण्याची आज्ञा सुटून पुढें आलेल्या नव्या प्रतिशब्दांपैकीं प्रत्यही पांच पंचवीस शब्द **सरकारी** राजवृत्तांत प्रसिद्ध होऊं लागले."

ज्या लेखांत " व " या अव्ययावरहि कडक बहिष्कार आहे व " कायदा " शब्द वापरणारावर देखील सावरकरांनीं तिरस्काराचा मारा केला आहे त्याच लेखांत ' सरकारी ' हा शब्द पुनः पुनः येतो आणि आघाडी हा

सुंदर मराठी शब्द टाकून 'बिनी' शब्द वापरला जातो. कदाचित् 'बिनीवर झुंजणारे" या ऐवजीं "चमू-पुरोभाग-युयुत्सु" या सारखा शुद्ध मराठी शब्द अद्याप तयार व्हावयाचा असेल !

सावरकर-पटवर्धनांच्या शुद्धतेच्या कल्पनेविषयीं आणखी एक गोष्ट सांगितली पाहिजे ती ही कीं, त्यांस इंग्रजी व फारशी शब्दच काय ते परकीय वाटतात. मराठींत कानडी शब्दांचा भरणा आहे, त्यासंबंधीं ते एक अक्षरहि बोलत नाहींत. यावरून त्यांची चळवळ भाषात्मक नसून राजकीय आहे असेंहि वाटतें. तसेंच अपरिचित व उच्चारण्यास कठीण असे संस्कृत शब्दच ते प्राधान्येंकरून निवडतात. ज्या मनुष्यापुढें लोकशिक्षण व बहुजनप्रगति हीं ध्येयें असतील तो "पैतृक निजस्वा" सारखे भिकार प्रयोग करणार नाहीं व ज्याचें ध्येय शुद्ध भाषाशास्त्रीय असेल तो फारशी शब्दांहूनहि कानडी शब्द दूरचे समजेल. पण रा. सावरकर यांस या दोन्हींचीहि फिकीर नाहीं. त्यांस कांहीं रूढ शब्द झोडून काढतांना मराठी भाषेच्या समृद्ध बगीच्याची वाताहत झाली तरी पर्वा नाहीं. कारण आपल्या सावरकरी सोट्यानें जमीनदोस्त केलेल्या प्रत्येक रोपाचे जागीं एक एक अवजड ओंडका ढकलून आणण्याचें धाष्टर्य त्यांच्या अंगीं आहे !

त्यांच्या भाषाशुद्धीच्या कल्पना कृतींत आणतांना ते कोणकोणते अत्याचार करण्यास मंजुरी देतील हें त्यांच्या समोरील पाश्चात्य आदर्श पाहिले म्हणजे दिसून येईल. सावरकर हे मुसोलिनी किंवा कमालपाशा यांसारखे सर्वाधिकारी असते तर त्यांनीं काय केलें असतें हें त्यांच्या 'प्रतिभे' तील लेखावरून दिसून येईल. सावरकर तुर्कस्तानांतील सक्तीवर फारच फिदा दिसतात. आणि कमालपाशानें रोमन लिपी सुरू करण्यांत काय स्वाभिमान दाखविला हें फक्त सावरकरांसच माहीत ! आणि तोहि त्यांस सोईस्कर वाटत असल्यास अखिल हिंदुस्थाननें भगवद्गीतेची आवृत्ती इंग्रजी स्पेलिंगांतून वाचावी असेंहि फर्मान ते उद्यां काढतील !

येथपर्यंत सावरकर पटवर्धनांच्या विचित्र व आततायी भाषाशुद्धीसंबंधीं झालें. आतां बहुजनसमाज ( आणि यांत लो० टिळक, चिपळूणकर वगैरेहि

मोडतात ! ) हे दोघे समजतात तितका स्वाभिमानशून्य व कर्तव्यशून्य आहे कीं काय हें पाहिलें पाहिजे.

आपली विद्रूप भाषा न स्वीकारणारावर सावरकर–पटवर्धन या दोघांचा मुख्य आरोप म्हणजे हे सर्व लेखक, वक्ते व सामान्यजन मूळशब्द मारून फारशी व इंग्रजी शब्द घेतात. हा आरोप विचारांत घेतांना बऱ्याच बारीक तपशीलांत शिरावें लागेल व तें मला प्रस्तुत लेखांत करावयाचें नाहीं. म्हणून या आरोपाचा मुख्य भाग ढासळून पाडणारी एकच बाजू आपण प्रथम पाहूं. ज्या फारशी शब्दांनीं कोणत्याहि मराठी अथवा संस्कृत शब्दाची गळचेपी केली नसेल व मराठींत एक स्वतंत्र कल्पना व एक स्वतंत्र नादमाधुर्य आणलें असेल, अशांस हे शुद्धिवाले पंक्तिपावन ठरविण्यास तयार आहेत काय ? बहुजन समाज असेच पुष्कळ शब्द वापरीत आहे. या जातीच्या शब्दांनंतरची जात म्हणजे जे शब्द धड मूळ शब्द घालवीतहि नाहींत व फारसा महत्त्वाचा नवीन अर्थ अगर नाद मराठी शब्दसंग्रहास देतहि नाहींत. उदाहरणार्थ मेहेरबानी. पण अशा शब्दांसहि मी " अजागलस्तनस्यैव " निरर्थक समजत नाहीं. जो भाषा हें एक आराधनाचें किंवा प्रहाराचें हत्यार समजून कौशल्यानें वापरतो, असा कुशल लेखक जेथें ' कृपा ' वापरील तेथे ' मेहेरबानी ' वापरीलच असें नव्हे आणि जेथें ' प्रेम ' वापरील तेथें ' मोहबत ' कधींच वापरणार नाहीं ! पण हे सर्वच त्यानें कोठें ना कोठे वापरलेले असतील. आणि हे सर्वच त्याच्या लिखाणांत अज्ञ जनांच्याहि कानास खुपणार नाहींत. पटवर्धन मात्र " मालकाचा नौकर " काढून त्या जागीं " प्रभूचा किंकर " हे शब्द आवेशानें आणतील आणि बिचारे धनी, गडी वगैरे शुद्ध मराठी शब्द या आततायी प्रचारकांच्या पुस्तकी शब्दापायीं तुडविले जातील ! मला या बाबतींत असें स्पष्ट सांगावयाचें आहे कीं, मराठींत असलेल्या सर्वच परकीय शब्दांनीं मूळ मराठी शब्द मारलेले नाहींत. उलट भाषाशुद्धीवाले मात्र ( दोघेहि स्वाभाविकता व सुलभता यांस सर्वस्वी पारखे असल्यामुळें ) कित्येक चांगले शब्द मारीत आहेत व कित्येक भिकार समास मराठीच्या माथीं मारीत आहेत.

असें कां होत आहे ? यांस भाषाशुद्धीची कळकळ नाहीं काय? व उलट ज्यास कळकळ असेल असा मनुष्य भाषेंत शिरणाऱ्या अगर शिरलेल्या शब्दांबाबत कांहींच निर्बंध पाळणार नाहीं काय ? पहिल्या प्रश्नाचें उत्तर म्हणजे यांस स्वभाषेची कळकळ आहे कीं नाही हें त्यांच्या आजवरच्या लिखाणावरून ठरविणें झाल्यास निकाल त्यांच्याविरुद्ध द्यावा लागेल. आणि ही कळकळच जर संशयित ठरली तर त्यांच्या या प्रचंड गडगडाटाचें इंगित काय ? या दोघासहि भाषेसारख्या सामान्य जन आणि असामान्य कलावंत यांच्या प्रांतांतील, अतएव केवळ साध्यासुध्या तरी, नाहींतर सूक्ष्म कलात्मक तरी —पदार्थांविषयीं उत्साह वाटणें कठीण आहे. यांतील एक आततायी आहेत व दुसरे तर्कटी आहेत. जेथें तारतम्य हाच प्रधानगुण आहे अशा ठिकाणीं दोघांसही जाणें परवडणार नाहीं. या अत्युत्साही व प्रचंड उद्योगी वीरांची धामधूम, त्यांस वाटत आहे स्वभाषेची, पण वस्तुतः आहे परकीय भाषेसंबंधीं संताप निष्फळ दाखविण्याची !

या सुमारास एक नाजुक प्रश्न उघडच पुढें आणलेला बरा. ज्यांनीं आपल्यावर राज्य केलें आहे व जे आपणांवर राज्य करून गेले त्यांच्या भाषेवर आग पाखडणें स्वाभिमानाचें आहे कीं नाही ? मी या बाबतींत असें म्हणेन कीं केवळ आपणांवर राज्य करीत आहे या कारणानें एखाद्या राष्ट्राची संस्कृति श्रेष्ठ समजण्याची वृत्ति गुलामगिरीची होय. आणि भाषा हें एक संस्कृतीचें अंग आहे व संस्कृतिवर्धनाचें साधन आहे. अतएव भाषेसंबंधींदेखील जागरुक राहावें. पण केवळ भाषा म्हणून भाषा सोवळी राखणें हें शनिवारवाड्यावर मुकटे वाळविण्याहून कमी हास्यास्पद नाहीं. जे लोक राममंदिर याठिकाणीं मशीद म्हणतील ते भाषेची व संस्कृतीची अक्षम्य हानि करीत आहेत. उलट जे लोक भवानी समशेर या जागी भवानी खड्ग म्हणतील ते कांहींच साधीत नाहींत. याचा अर्थ संस्कृतीचें साधन या दृष्टीनें भाषाशुद्धीस बहुजनसमाजाची मान्यता मिळेल, पण परकीयांच्या संस्कृतीची महत्त्वाचीं अंगें स्वीकारून आपल्या संस्कृतीची अवहेलना करणें आणि केवळ भाषाशुद्धीवर जोर देणें म्हणजे मात्र राष्ट्रीय दृष्ट्या भाषाशुद्धि नव्हे. रा. पटवर्धन यांस सुनीत, गज्जल यांसारखे परकीय काव्यप्रकार मराठींत आणून लोकांस

त्यांची बातमीहि लागण्यापूर्वी अमुक सुनीत 'गोपाल' प्रकाराचें आहे या-सारखे प्रयोग करणें यांत भाषाशुद्धीची हानी वाटत नाहीं. रा. सावरकर यांनी-हि प्रतिकारास पोषक असल्यास मांसाहारापासून तों वर्णविध्वंसनापर्यंत कोण-त्याहि परकीय गोष्टीचा बेधडक पुरस्कार करण्यास कमी केलेलें नाहीं. अशा संकटांत धिटाई दाखविणाऱ्या अशा वीरांनीं भाषेच्या बाबतींत मात्र एखाद्या आजीबाईप्रमाणें सोवळें संभाळणें हास्यास्पद होय. आमची त्यांस नम्र विनंती आहे कीं 'संस्कृतिसंवर्धन' व राष्ट्रीयदृष्ट्या प्रतिकार या दोहोंस भाषाशुद्धि किती प्रमाणांत आवश्यक आहे या दृष्टीनें त्यांनीं प्रस्तुत प्रश्नाचा विचार करावा.

केवळ भाषेच्या दृष्टीनें परकीय शब्दांसंबंधीं स्वाभाविक निर्बंध कोणते ? या प्रश्नाचा विचार करतांना परकीय शब्द स्वभाषेंत येतात कीं आणले जातात याचा प्रथम विचार केला पाहिजे. सावरकर—पटवर्धन ज्या पद्धतीनें शब्द आणून सोडतात त्या पद्धतीनें कुठलाच नवीन शब्द भाषेंत रूढ होत नाहीं. एखादा संस्कृत शब्द, प्रतिशब्द अथवा एखादा परभाषेंतील शब्द प्रचारकी बाण्यानें आणणें स्वाभाविकतेस विघातक आहे. आजवर जे जे नवीन शब्द आले ते ते कोणी पंडितानें आणून सोडले नाहींत. सामान्य जनांच्या स्वाभाविक संपर्कांत ते केव्हां आले हें कळलेंहि नाहीं. त्यांतहि कांहीं रुजले व कांहीं रुजले नाहींत. कांहीं मुळचें स्वरूप अजिबात पालटून मराठी जिव्हेवर नांदूं लागले. या सर्व प्रक्रियेचा अर्थ या भाषावृक्षावरील शब्द तोडून त्या भाषेच्या फांदीवर चिकटवून दे असा प्रकार कधींच होत नाहीं. भाषेला कोणते शब्द मानवतात व कोणते मानवत नाहींत हें हळूहळूं रूढ होणाऱ्या शब्दांच्या इतिहासाकडे पाहिल्यास स्पष्ट दिसून येईल. या शास्त्रांत खोल शिरण्याचें हें स्थळ नव्हे.

भाषासिद्धीच्या प्रवाहाची मुख्य दिशा मात्र स्पष्ट आहे. प्रत्येक भाषेला कांहीं विशिष्ट नाद असतो. हें नादवैशिष्ट्य ही भाषा बोलणारांच्या उच्चारण-पद्धतीवर ( Accent and Intonation ) अवलंबून असतें. जुने शब्द हल्लींच्या स्वरूपांत कां आले याचें उत्तर या राष्ट्रीय वैशिष्ट्यांत सांपडतें. अशा स्थितींत भाषेच्या विशिष्ट रचनेचा भंग करून केवळ संस्कृत कोशांत आढळतात

म्हणून हवे ते शब्द मराठीवर लादतां येणें शक्य नाहीं. यायोगें लिहिण्याची भाषा पंडिती व अस्वाभाविक होत जाईल आणि व्यवहाराची भाषा व पुस्तकी भाषा यांचा संबंध अजिबात तुटेल. मराठीनें स्वाभाविक रीत्या जे नवीन शब्द बनविले आहेत त्यायोगें हा वैशिष्ट्यभंग झालेला नाहीं. याचें कारण व्यवहाराच्या अकृत्रिम ओघांत आलेले शब्द पांडित्याची कदर न करतां शक्य तों मराठी पेहराव घेत घेत आले आहेत. तसेंच प्रत्यक्ष व्यवहाराच्या वातावरणांत जे शब्द प्रथम पदन्यास करतात ते भाषेंतील विशिष्ट रचनेमध्येंहि (Idioms) आपलें योग्य स्थान ठरवीत ठरवीत येतात. सारांश ते आगांतुक व उपटसुंभ वाटत नाहींत. या बाबतींत पंडिती वळणाचे लोक दोन चुका करतात. एकतर केवळ कोण नाहि संस्कृत शब्द मराठींत दडपण्यास हरकत नाहीं या भ्रमानें मराठी शब्दसमूहाचें स्वरूप बिघडवितात. तर उलट दुसरें म्हणजे कधीं कधीं मराठीस अनुकुल असें रूप घेणाऱ्या शब्दांस उलट मूळ स्वरूपाप्रत पाठवितात. पटवर्धनांसारखे लोक अजिबात फारशी शब्द वापरणार तरी नाहींत किंवा वापरलेच तर त्यांचें मराठी रूप बदलून त्यांस खास इराणी पोषाखांत तरी वापरतील ! उदाहरणार्थ गहजब हा शब्द आपल्याकडील बायकादेखील वापरतात. पटवर्धन, अर्थात् आजचे पटवर्धन त्याबद्दल " तांडवाकांत " यासारखा कांहींतरी भेसूर शब्द वापरतील व ज्यावेळीं ते फारशी शब्द पंक्तिपावन करून घेणें पवित्र धर्म समजत त्यावेळीं त्यांनीं या शब्दांचें मूळ पर्शियन [illegible] मराठी लोकांस शिकविण्याचा यत्न केला असता. त्यांनीं एकट्यांनींच " गझब " हें शुद्धरूप वापरून गहजब केला असता ! सारांश सामान्य लोक व पंडित यांचें गोत्र कधींच जमत नाहीं.

सामान्य लोक भाषेचें नादवैशिष्ट्य राखूत असतात तर पंडित कोशांतील शब्द जतन करण्याचा प्रयत्न करीत असतात. एखादा मूळ शब्द ( आई शब्दाप्रमाणें ) कानडी होता कीं ( पगार शब्दाप्रमाणें ) पोर्तुगीज होता कीं ( वतन शब्दाप्रमाणें ) फारशी होता हें सर्वसाधारण मनुष्य पाहत बसत नाहीं. जे शब्द भाषेंत स्वाभाविक मार्गानें रूढ झाले आहेत ते वापरण्यास त्यास मुळींच हरकत वाटत नाहीं. याचा अर्थ हे पंडित असा करतात कीं, सामान्य लोकांची भाषा शुद्ध नाहीं व आपली भाषा शुद्धांत

शुद्ध होय ! सामान्य लोकांस लेखनांत किंवा भाषणांत हवें तें खपत असतें तर हा आरोप खरा म्हणतां आला असता. पण पटवर्धनांचा 'हर्राजी' शब्द ऐकतांच कोणताहि मनुष्य हें मराठी नव्हे असें तात्काळ म्हणाला असता. यावर पटवर्धनांचें उत्तर येईल कीं, "आम्ही जे फारशी शब्द वापरले ते पूर्वी बखरींतून वगैरे वापरले होते. बखरवाले हे तर तुम्ही पंडिती वळणाचे म्हणत नाहींना ?" पण बखरींतील फारशी शब्दांच्या भरण्याबाबत एक निराळीच परिस्थिति लक्षांत ठेविली पाहिजे. बखर लिहिणारे किंवा मराठेशाहींतील पत्रव्यवहार लिहिणारे लोक हे एका अस्वाभाविक परिस्थितींत वाढले होते. त्यामुळें त्यांचा शब्दसंग्रह हा सामान्य जनसमूहाचा शब्दसंग्रह कधींच होऊं शकला नाहीं. गाण्याच्या बैठकी, सैन्याच्या छावण्या अथवा बाजार यांमधील साध्यासुध्या प्रसंगांत जे परकीय शब्द येतात ते सहज रूढ होतात व त्यांचीं रूपेंहि भिन्न भाषा बोलणारांच्या परस्पर संमतीनें नादानुकूल बनत जातात. या व्यवहारी भाषेंत लेखनांतील भाषेइतकी परकी शब्दांची गर्दीहि नसते. शिवाय बखरी, ऐतिहासिक पत्रव्यवहार ज्या काळीं लिहिले गेले त्या काळीं संस्कृत विद्येचें पुनरुज्जीवन होऊन वाङ्मयात्मक वळणावर लिहिणारे लेखक मराठींत तयार झाले नव्हते. असे लेखक इंग्रजी शिक्षणानंतर सहजच निर्माण झाले. त्या लेखकांनीं बखरींप्रमाणें फारशी शब्दांचीहि खैरात केली नाहीं किंवा शुद्धिवादी कृत्रिम लेखकांप्रमाणें अपरिचित संस्कृत शब्दांचीहि खैरात केली नाहीं. त्यांच्या भाषेंत रूढ आणि अपभ्रंशाच्या राजमार्गानें 'शुद्धीकृत' झालेले फारशी व संस्कृत शब्द यांचा सुंदर मिलाफ आढळतो. त्यांनीं कित्येक नवे संस्कृत शब्दहि वापरले; पण ते आजच्या शुद्धिवाल्यांच्या वळणाचे नाहींत याचें कारण हे लेखक श्रुतिविहीन नव्हते हेंहि असूं शकेल !

सामान्य लोक ज्याप्रमाणें पटवर्धनांच्या हर्राजी शब्दास हरकत घेतील त्याप्रमाणें ते त्यांच्या कित्येक प्रयोगांसहि घेतील. सावरकर आणि पटवर्धन या दोघांस आहार, पोषाख, कलाकौशल्य हे परकीयांपासून घेण्यापेक्षां घेतलेले परकी शब्द नुसते राहूं देणें देखील भयंकर वाटतें. तसेंच भाषाशुद्धि म्हणजे फक्त शब्दशुद्धि हाहि त्यांचा विचार त्यांच्या वंचनेचाच द्योतक आहे. त्यांस

परकीय शब्दांचा स्पर्श खपत नाहीं, पण परकीय प्रयोगांबद्दल (idioms and Constructions) मात्र यांस मुळींच भीति वाटत नाहीं ! एकतर त्यांच्या स्वभावाप्रमाणें त्यांनीं या बाबतींत गिल्ला केल्याचें दिसत नाहीं. आणि दुसरें खुद्द त्यांच्या लिखाणांत कमालीचे हास्यास्पद परकीय प्रयोग काढून दाखवितां येतात. मनोराज्य शब्द मराठींत प्रचलित असून 'मनो-दुर्ग' हें (Castles in the air) या इंग्रजी शब्दप्रयोगाचें भाषांतर करीत बसणें याला आम्ही गुलामगिरी समजतों. सावरकर, पटवर्धन तसें म्हणत नसतील. 'जमीनअस्मानाचें अंतर' यांतील फारशी जमीन आणि अस्मान खणून काढण्यास सज्ज झालेले सावरकर आणि पटवर्धन Poles asunder या इंग्रजी वाक्प्रचाराचें (Idiom) 'दोन ध्रुवांइतकें दूर' यासारखें मराठी भाषांतर मात्र शुद्ध समजतील. ही झाली विशिष्ट शब्दप्र-योगांची (Idioms) स्थिति. आतां वाक्यप्रयोगांकडे पाहूं. आपल्या ग्रंथांत पानाच्या तळाशीं टीपा देतांना 'पहा पान २६३' असें आजचे सर्व प्रतिष्ठित मराठी लेखक लिहितात. पटवर्धन हेहि अनेक वेळ तसें लिहून गेले आहेत. या ठिकाणी '२६३ पान पाहावें' असें म्हटलें तरच तें मराठी असें आम्ही समजतों. फार कशाला, ज्यांतील भाषा, भावना, धर्म-कल्पना सर्वच बाटग्या आहेत अशा चरणांनीं पटवर्धनाचें प्रतिष्ठित काव्यहि भरून गेलें आहे.

"येथें तो निजला प्रभूमधि कुठे आतां सभोतीं फुलें !"

ही ओळ शुद्ध मराठी नव्हे, शुद्ध घेडगुजरी आहे. सामान्य मनुष्य वरील प्रयोग व शब्द स्वयंस्फूर्तीनें अशुद्ध समजतो. त्यास शुद्धीची चळवळ लागत नाहीं.

याप्रमाणें खरी भाषाशुद्धि आणि सावरकर-पटवर्धनी भाषाशुद्धि यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. हे पंडित जी शुद्धि करूं पाहत आहेत तिची भाषेस जरूरी नाहीं. हे लोक भाषेंत जे भयंकर प्रयोग आणून सोडीत आहेत त्यांच्याविरुद्ध शुद्धीची चळवळ करणें महाराष्ट्रास अपरिहार्य होऊन बसलें आहे. प्रस्तुत लेखांत फक्त सावरकर व पटवर्धन यांच्या मूळ भूमिकेचा परामर्ष घेतां आला. त्यांच्या विमानाचे खूर धरून शुद्धीच्या स्वर्गात जाऊं

पाहणाऱ्या 'इतरेजनां' चा धूमाकूळ काय वर्णावा ? एकजण 'राजश्री' सारखा सर्वांग सुंदर व वाडवडिलांनी वापरलेला शब्द फेकतो व त्या जागीं 'श्रीयुत' घालतो, तर दुसऱ्यास श्रीयुत हा शब्द पांडित्यप्रदर्शनाची भूक भागविण्यास पुरा पडत नाहीं म्हणून त्या जागीं ' रावमहाशय ' वापरतो ! साधा Player शब्द घ्या. त्यासहि यांना शब्द सांपडू नये ! जसें कांहीं आमच्याकडे पूर्वी खेळच नव्हते. ' खेळांतील गडी, गडी वांटून घेणें' वगैरे प्रयोग पोराबाळांसह सर्वांना माहीत आहेत; पण त्याचे जागीं आज अखिल महाराष्ट्रांतील वर्तमानपत्रें 'खेळाडू' शब्द वापरीत आहेत. या साध्या शब्दांत त्यांचें जातिवंत मराठी शब्दाविषयींचें अज्ञान, नवीन चालू केलेल्या शब्दाविषयींचें अज्ञान आणि "पूर्वी आपल्याकडे कांहींच नव्हतें, प्रत्येक संस्थेचें आणि कल्पनेचें भाषांतर करण्याखेरीज गत्यंतर नाहीं" ही लाचारी, हे तीनहि मनोगंड एकदम दिसून येतात. याच संबंधांतील 'फटका' शब्द घ्या. "नायक नायडू यांनीं तीन फटके मारले व नंतर त्यांचा त्रिफळा उडविण्यांत आला." यांतील बाकीचे विदुषकी प्रयोग आपण तूर्त बाजूला ठेवूं. पण "फटका" शब्द, आज अमेरिकेंतून येथें आलेला मिशनरीदेखील अशा ठिकाणीं वापरणार नाहीं. ज्या भाषांतरबहाद्दरांना टोल्याबद्दल फटका शब्द चालतो त्यांस चपराक शब्दहि चालला असता ! या प्रतिशब्दांची निवड करतांना यांस स्वभाषेचें साफ विस्मरण आणि परकी शब्दाची एकाग्रतेनें जाणीव असें होऊन जातें काय ? यांच्या निवडींत दिसून येणारें अज्ञान आपण पाहिलेंच. आतां निर्मितीकडे ( अथवा पटवर्धनांच्या लाडक्या 'सर्गशक्तीकडे' पहा. ) या सर्गवीरांनीं आणि टांकसाळ्यांनीं कृपा करून एक गोष्ट लक्षांत ठेवावी कीं, कोश कावोटींत मारल्यानें एका भाषेंतील अनेक शक्तींच्या वलयांनीं अंकित अशा शब्दरत्नांस दुसऱ्या भाषेंत आणतां येत नाहीं. Honeymoon, Goodnight, Thank you वगैरे शब्दप्रयोगांचें मराठी करतां न आल्यास मराठीस कमीपणा आहे असें मानणारे स्वभाषेच्या हीनत्वाच्या कल्पनेनें ग्रस्त असले पाहिजेत. मराठींतील गर्भाधान, तिळगूळ, भाऊबीज वगैरे शब्दांचें लॅटिन समासान्वित भाषांतर करण्याचा खटाटोप इंग्रज करतील काय ? मला वाटतें मराठ्यांचा अंमल इंग्लंडावर चालू झाला

असता तर त्यांच्यांतील कांहीं असंतुष्ट व अरसिक वैय्याकारणांनीं या चळवळी हातीं घेतल्या असत्या! कित्येकांस वर दिलेलीं उदाहरणें प्रस्तुत विवेचन चुरचुरीत करण्याकरितां कपोलकल्पित बनविलीं आहेत असें वाटेल. अशा मंडळीस रा. पटवर्धनांनीं Golden Treasury हें पुस्तकाचें विशेष नांव 'हैमकोश' म्हणून मराठींत आणण्याचा यत्न केला आहे हें ठाऊक आहे काय? आणि पर्लव्हाइट हें पाश्चात्य नटीचें नांव घेतल्यास मराठीची शुद्धि जाईल म्हणून तिचें 'मुक्ता ढवळे' असें नामकरण करणारे भाषाकोविददेखील आपले पटवर्धनच होत! चोवीस तास इंग्रजींत वागणाऱ्या आजच्या विपरीत परिस्थितीच्या दासांनीं अपरिहार्य म्हणून खाजगी संभाषणांत एक इंग्रजी शब्द वापरतांच त्यांजवर निर्भेळ दास्यवृत्तीचा व सदोष भाषा-वधाचा जोड आरोप ठेवणाऱ्या शुद्धिभक्तांची शुद्धि ही अशा प्रकारची आहे! फारशी इंग्रजी शब्दांवर बहिष्कार घालणें म्हणजे शुद्धि अशा मताचीं माणसें देखील सावरकर-पटवर्धनांसारख्या पुढाऱ्यांवर खास बहिष्कार घालतील.

भाषांतर म्हणजे भाषाशुद्धि या हीनग्रहानें ग्रस्त अशा लेखांपैकीं फक्त प्रख्यातांवरच या ठिकाणीं मीं आघात केला आहे. त्यांच्या निर्बुद्ध आणि हास्यास्पद अनुयायांनीं जे शेकडों शब्दप्रयोग या भाषेंत सोडले आहेत त्यांचा मी उच्चारहि करूं इच्छित नाहीं. यांच्या भाषाशुद्धिचीं तत्त्वें लोकांनीं स्वीकारलीं आहेत कीं नाहींत हा प्रश्न वेगळा; पण ज्या हिरवट लेखकांस विचारशक्तीच्या गंभीर हेतुव्यतिरिक्त भाषा वापरणें, टूम म्हणून शब्द काढणें ही भाषामातेची विटंबना वाटत नाहीं अशांनीं काढलेले विद्रूप प्रयोग मराठीची कांहींच हानी करणार नाहींत असें नव्हे. या शुद्धिवाल्यांनीं आधींच मराठीचें सौंदर्य धोक्यांत आणलें आहे. आणि ही शुद्धि नसून विद्रूपता आहे हें वेळींच सांगण्याचें नैतिक धैर्य जबाबदार व तत्त्वनिष्ठुर व्यक्तींनीं न दाखविल्यास मराठी भाषेचें वाटोळें होईल.

प्रचारवेडानें वेडावलेल्यांचा आणखी एक दुराग्रह येथें सांगितला पाहिजे. ते मोठ्या भविष्यनिष्ठेनें सांगतात कीं "लोकहो!" "पैतृक निजस्व," "स्वागतिर्णे"

" सायकल विक्रम " वगैरे प्रयोग तुमच्या दुबळ्या भावनाप्रधान मनास आज कसेसेंच वाटोत. पण आणखी पन्नास वर्षांनीं तुमच्या नातवांस यांतच ज्ञानेश्वरी ओव्यांचें माधुर्य प्रतीत होईल ! " ही निष्ठा खरोखर अतुलनीय आहे. कोणासहि या भविष्यनिष्ठांचा हेवाच वाटेल. पण आम्हांसहि आमची निष्ठा आहे आणि तिला स्पर्श करून आम्ही सांगतों कीं, " हीं भूतें पन्नास वर्षांनीं माणसांत येतील; म्हणूनच आज त्यांस गाडा ! " विद्रूप प्रयोग भाषेंत रूढ झाल्याचीं उदाहरणें आहेत. एक रूढ प्रयोग दुसऱ्या तितक्याच रूढ प्रयोगाइतका नेहमींच अर्थपूर्ण व नादयुक्त असेलच असें नसतें; आणि म्हणूनच एक सबंध भाषाची भाषा दुसऱ्या भाषेहून अधिक नादगौरवसंपन्न असते. आणि म्हणूनच नवीन शब्द व प्रयोग तर्ककर्कश टांकसाळ्यांच्या हातीं देऊन चालत नाहीं. ते भाषाप्रचाराचा मक्ता न घेतां हृदयाचा ठाव घेण्याकरितां लिहिणाऱ्या प्रतिभावान व नैसर्गिक लेखणींतून न कळतच जन्मावे लागतात. वरील केवळ शब्दसोनारांस कुठल्याहि निरोगी समाजांत कोणी क्षणभरहि उभे करणार नाहीं. दुर्दैवानें परतंत्र देशांत मात्र पारतंत्र्याचा रोग बरा करण्याच्या भ्रामक आशेवर या विषवल्ली तरारतात !

रा. सावरकर यांच्या अनेक लेखांतून व ग्रंथांतून हजारों विद्रूप शब्द विखुरले आहेत. ते पुरे न पडूनच कीं काय, त्यांनीं आपल्या परवांच्या ' सरकारी राजवृत्तांतांत ' एक ताजी यादी प्रसिद्ध केली आहे ! " रेकॉर्ड मोडलें म्हणजे रेकॉर्ड ऑफिसांतील कपाट मोडलें कीं... " इ० याप्रमाणें रेकॉर्ड शब्द केवळ परकीच नव्हे तर अर्थहीन आहे असें भासविण्यापर्यंत सावरकर यांची मजल गेली आहे. आणि त्यांनीं सुचविलें काय ? तर " उच्चांक मोडला " ! प्रतिपक्षियांस पोरकटपणा मानवत असेल तर तोहि विचारील कीं, ' कायहो, त्या मनुष्यानें पोहतां पोहतां एक उंच आंकडा हातांत घेऊन मोडला, कीं उंच अशा कोणा व्यक्तीची मांडी मोडली ? ' सारांश तूर्त शुद्धीवाले टवाळी करीत असले तरी त्यांचे प्रतिस्पर्धी प्रतिकार म्हणून तरी टवाळीचा अवलंब करतीलच. बरें, याच रेकॉर्ड शब्दाला आज किती शब्द चालू करण्यांत आले आहेत, हें या शुद्धीवाल्यांसच विचारावें ! आतां त्यांतील सर्वच रा. सावरकरांच्या शब्दाइतके हास्यास्पद नाहींत हें

कबूल केलें पाहिजे. या मानानेंच इतर भाषांतरी शब्द! ' कायदेपंडित ' बद्दल ' निर्बंधपंडित ' शब्द रूढ न कराल तर तुम्ही दास्यवृत्तीचे आणि सावरकरांच्या नांवामागें " बॅ. " हें उपपद ठळक ठशांत छापणें मात्र शुद्ध मराठी! Maternity Home बद्दल ' प्रसूतिगृह ' अथवा 'बाळंतघर ' हे शब्द कोणीहि अपंडितानें सहज वापरले असते. पण आज सावरकरी वळणाचे लोक " मातृ-प्रसूति-गृह " हा समास रूढ करीत आहेत. कदाचित् तें चुकून पितृप्रसूतिगृह असें वाटून भावी माता बिचकून परततील! ही संदिग्धता या पंडितांनीं टाळली. आणि ही भाषा रूढ करणारे मनु, याज्ञवल्क्य, मुसोलिनी, कमाल आपल्या शूर शिष्यांस आश्वासितांत, " नवा शब्द वापरा कीं तो अन्वर्थकच बनलाच!! " अहो अन्वर्थकता ! अहो वैदग्ध्यम् !

बरें ही अर्थशून्य नादशून्य अर्धसंस्कृत भाषा तरी हे कितपत टिकवितात! आजचा शब्द उद्यां वापरला जाईलच असा नियम नाहीं. या पानावर निखालस इंग्रजी शब्द मूळ स्पेलिंगांत तर त्याच पुस्तकाच्या पुढील पानावर त्याचें दुर्बोध भाषांतर! असें किती तरी वेळां दाखवितां येईल. नवीन शब्द हा पाहुण्यासारखा किंबहुना पांथस्थासारखा असतो. तो प्रथमदर्शनींच औचित्यभंग करून प्रवेश करील तर त्याचें स्वागत होण्याची आशाच नको. ज्यांस भाषा-सौष्ठवाचें ज्ञान उपजत असतें त्यांचे नवे प्रयोग इतक्या योग्य स्थलीं पडतात कीं ते भाषेच्या गाभ्यांत (Idioms pregnant with associations and suggestions ) सहजच स्थान मिळवितात. याउलट " मी एका मुसलमान शब्दाची मुंडी छाटली आहे—मला तुमच्या डोक्यावर बसण्याचा हक्क आहे! " येवढ्याच जोरावर शिरणारे शब्द भाषासौष्ठवाचा इतकेंच काय, पण नैसर्गिक वाढ हा जो भाषेचा प्राण त्याचाच घात करतात.

हा ओतीव शब्दांचा कारखाना काढण्याचा प्रयत्न कोणत्या भ्रामक कल्पनांनीं चालविला आहे तें आपण पाहिलेंच आहे. तथापि पटवर्धन—सावरकर यांच्या ओतीव शब्दसंग्रहांत असेहि कांहीं प्रकार आहेत कीं, ज्यांची मीमांसा त्यांच्या हुमशाहीचा मागोवा घेत जाऊनहि हातीं लागत नाहीं.

"चपखल नी अद्ययावत्" या सावरकरी प्रयोगांतील "नी"; तसेंच "सौंदर्य-समीक्षक अन् विचार-मंथर" या पटवर्धनी प्रयोगांतील 'अन्'; यांचें प्रयोजन, औचित्य आणि कुलशील शोधतां शोधतां "कवयोऽप्यत्र मोहिताः" अशी स्थिति झाल्याचें प्रस्तुत लेखकानें अनेक ठिकाणीं पाहिलें आहे. पण आणखी एका शुद्धीवाल्या पिल्लासंबंधीं अनेकांना अचंबा वाटला असेल. तें पिलूं म्हणजे "वा" हें अव्यय! "किंवा," "अथवा," हीं विकल्पार्थी अव्यय सोडून "वा" हें नवेंच पिलूं सोडण्यानें कोणतें कार्य साधलें हें या मंडळींनीं जाहीर करावें. नवीन शब्द आणि प्रयोग यांचा उपक्रम योग्य स्थळीं भाषेचें सौंदर्य व अर्थगांभीर्य वाढवूं शकेल. पण ज्यांच्या भाषेंतील वाक्यें आधींच भट्टीकाव्यांतील श्लोकांप्रमाणें व्याकरण-रूपसंपन्न झालीं आहेत त्यांनीं शुद्ध मराठी अव्ययांच्या तरी वाटेला जाऊं नये! तूर्त फक्त परकी शब्दांचा पाठलाग धामधुमीस पुरेसा नाहीं काय? उद्यां, 'परंतु' शब्द फार लांब वाटतो, रशियन भाषेंत किंवा जपानी भाषेंत त्याच अर्थीं एक अर्धस्वर "नि" तोहि ऱ्हस्व चालूं शकतो असें म्हणून हे लोक स्पर्धेखातर आणि भाषाशुद्धीखातर "अन्" बृद्धीखातर "तु" हें अव्यय 'वा' या अव्ययाप्रमाणेंच आपल्या संस्कृत बटव्यांतून काढतात कीं नाहीं पहा! आणि मग त्यांचीं वाक्यें पुढीलप्रमाणें 'चपखल' होतील. "**मी त्यांस स्वागतिलें! "नि" त्यांचें श्रम "अन्" अध्वखेद नष्टविले! 'तु' (परंतु) तूं मात्र शब्द-शून्य बसला होतास!**"

ही अतिशयोक्ति नव्हे, हा उपहास नव्हे, या लेखांत उद्धृत केलेलीं यांचीं वाक्यें याहूनहि दुर्बोध आहेत कीं नाहीं हें वाचकांनीं पाहावें.

हे सर्व खून कशाच्या जोरावर पचविण्याचा यांचा प्रयत्न आहे हें आपण वर पाहिलेंच आहे. त्या सर्व समर्थनाबरोबरच आणखीहि एक निरुत्तर समर्थन पुढें करण्यांत येत असतें. "अहो! पोलंड, जर्मनी, आयर्लंड यांनीं याच मार्गानें आपल्या भाषांचा उद्धार केला." पण या बाबतींतहि त्यांच्या भाषेची स्थिति शुद्धिचळवळीपूर्वीं कशी होती व आतां कशी आहे, हें ताडून पहाण्याइतकें ज्ञान आपल्या वाचकांना नाहीं हें जाणूनच हे लोक या

देशांकडे बोट करीत आहेत कीं काय असें वाटतें. नाहींतर ज्या भाषेचा शब्दसंग्रह व ग्रंथसंग्रह स्वभाषेहूनहि अधिक परिचित, अशा इंग्रजी भाषेचे उदाहरण प्रस्तुत प्रकरणीं नेमकें कां आठवूं नये ! शुद्धीवाल्याचें एकूणएक राष्ट्रीय, सांस्कृतिक, भाषाविषयक सिद्धांत इंग्लंडच्या ढळढळीत उदाहरणांपुढें साफ खोटे ठरतात म्हणून त्यांनीं इंग्रजी शब्दाप्रमाणें इंग्रजी राष्ट्रीय वस्तु-स्थितीवर देखील बहिष्कार तर टाकला नसेलना ? पण बहिष्काराच्या टोपली-खालीं चार परकी शब्दांचीं कोंबडींहि गुपचूप बसेनात तर एका अखंड दिग्विजयी राष्ट्राचा सूर्य ते कसा डाळून ठेवणार ! असें कोणते भाषाविषयक संकट आहे कीं जें इंग्लंडवर येऊन गेलें नाहीं ? इंग्लंडवर परकी सत्ता आली आणि गेली. इंग्लंडवर ग्रीक आणि लॅटिन संस्कृतीचें आवरणहि अनेक शतके पर्यंत होतें. युरोप खंडाची नखरेबाज आणि दरबारी म्हणून गाजलेली, फ्रेंच भाषा तर इंग्रजीच्या दाराशींच बसलेली. अशा चोहोंकडून पेटलेल्या वणव्यांत आणि फाटलेल्या आकाशाखालीं इंग्रजीनें आपला भाषावृक्ष निर्भयपणें वाढ-विला हा इतिहास भाषाशुद्धीवाले जाणून आहेत. आणि म्हणूनच इंग्रजीचें नांव घेण्याचें ते टाळतात. इंग्रज लोक फ्रेंच शब्दांवर बहिष्कार घालून लॅटिन शब्दांच्या आहारीं जाऊं इच्छीत नाहींत. इतकेंच काय पण इंग्रजींत एका शब्दास लॅटिन, ग्रीक, फ्रेंच, आणि शुद्ध इंग्रजी अथवा ॲंग्लो सॅक्सन याप्रमाणें अनेक पर्याय ( synonyms ) आहेत, याचा ते अभिमान बाळगतात. पण त्याचा अर्थ असाहि नव्हे कीं, केवळ टूम म्हणून कोणी फ्रेंच किंवा लॅटिन शब्द आणूं लागल्यास ते त्याची गय करतील ! शब्दांची शिकार आणि शब्दांची शेती हीं दोन्हीं ते सारखीच पंडिती आणि अस्वाभाविक समजतात. एका विशिष्ट संदर्भांत जो फ्रेंच प्रयोग सौंदर्यवर्धक समजला जाईल तोच अन्य ठिकाणीं पांडित्यनिदर्शक नाहीं तर टूमबाजीचा म्हणून गर्ह्य ठरविला जाईल. सारांश परद्वेषाहून स्वभाषाप्रेमास या बाबतींत ते अधिक प्रमाण धरतात. रा. पटवर्धन म्हणतात " बंडोबस्ट " "खटपट" वगैरे शब्दांस प्रतिष्ठित इंग्रजींत स्थान नाहीं. पटवर्धनांसारख्या तर्कजीवी गृहस्थानें एवढा हेत्वाभास पचवावा हें खरोखर एक नवल होय. कांहीं परकीय शब्द अशिष्ट भाषेंत ( Slang मध्यें ) पडतील हें उघडच आहे;

पण " पार्लमेंट " हा शब्द शुद्ध इंग्रजी नाहीं म्हणून त्यास कोशांत स्थान नाहीं असें पटवर्धन दाखवूं शकतात काय ? ते तसें करूं शकतील तरच इंग्रजी भाषा शुद्धीवाल्यांच्या सिद्धांतास पोषक आहे असें ठरेल. उलट इंग्रजींत फाजील शब्दनिर्मितीची खोड ( Neologism ) हा एक मोठा भाषा-रोग गणला जातो. आज सावरकर, पटवर्धन बनवीत आहेत तसें अकारण शुद्धीकरण कोणी चालविल्यास त्यांचे ग्रंथ तिकडे कोणी हातींहि धरणार नाहींत. बरें इतकें असून त्यांस शुद्ध अँग्लो-सॅक्सनचें सौंदर्य व सामर्थ्य समजत नाहीं असेंहि नाहीं. सारांश शब्द-संग्रहांच्या अनेक जातींचा योग्य उपयोग करून घेणें हाच या बाबतींत अखेरचा निर्णय त्यांच्या भाषाविशारदांनीं मान्य केला आहे.

—आणि म्हणूनच हा इतिहास शुद्धीवाले मुद्दाम लपवितात. आणि पोलंड, जर्मनी वगैरे दूरच्या प्रांतांत आपल्या भाषाबांधवांस नेत असतात ! बरें, ज्या पन्नास भाषांची हे प्रचाराच्या भरांत नांवें घेतात त्यांचे विकार आणि औषध-योजना स्वभाषेवर लादण्याइतकी बारीक अंतस्थ परिस्थिति या प्रचारपंडितांस तरी माहीत असणें शक्य आहे काय ? जिज्ञासू मनुष्य जी माहिती दुरून ज्ञान-कोशांतून मिळवितो ती माहिती ती भाषा बोलणाऱ्या लोकांच्या माहितीइतकी अंतस्थ नसते. म्हणून या शुद्धीवाल्या देशांचे बाबतींत पुढील प्रश्न उपस्थित होतात. यांच्या या बहिष्कारानें भाषेचें कल्याण झालें कीं निव्वळ कांहीं परकीय भाषांवर सूड घेण्याकरितां त्यांनीं स्वभाषेचें मातेरें करून घेतलें ? पण आपण तेथील लोकांस तारतम्य आहे असेंच धरून चालूं. तरी त्या देशाचें तारतम्य हें या देशांत तारतम्य ठरेलच असें नव्हे. विशिष्ट परिस्थितिबरहुकूम बदल हाच तर तारतम्याचा विशेष. त्यांच्या भाषेची व मराठीची आजची स्थिति एकच आहे काय ? त्यांच्या भाषांवर आघात करणाऱ्या भाषा मराठींवर आघात करणाऱ्या भाषांच्याच प्रकृतीच्या आहेत काय ? आघाताच्या परिणामाचें प्रमाण तिकडे व इकडे एकच आहे काय ! पहिल्या दोन प्रश्नांचीं उत्तरें देण्याइतपत त्या शब्दांची माहिती कोणाच शुद्धीवाल्यास असणें शक्य नाहीं. शेवटचा प्रश्न केवळ आंकड्यांचाच असल्यामुळें त्याची माहिती सुलभ आहे. आणि ती सावरकरांनीं दाखविलीहि आहे. सावरकर म्हणतात,

" आमच्या भाषेंत कांहीं चारशें पांचशें शब्द घुसले आहेत तेवढे देखील काढणें आम्हांस कोण जड जातें ! तुर्कांच्या वाङ्मयांत कांहीं परकीय शब्दच तेवढे घुसले नव्हते तर एक परकीय भाषाची भाषाच घुसली होती. स्वतःची तुर्की ही केवळ चालचलाऊ बोली ! साहित्य नी वाङ्मय असें तिच्यांत मुळींच नव्हतें ! " एकूण सावरकरांच्या तुर्की नमुन्यांत आणि तें सुधारूं पाहत असलेल्या बिचाऱ्या मराठींत एवढी तफावत आहे तर ? ज्यास सर्पदंश झाला, तो बोट कापीत आहे म्हणून ज्यास ढेकूण चावला त्यानेंहि चिडून हात कापावाना ? वीरश्रीच्या भरांत सावरकरांसारखे वीर आत्मघात देखील करावयाचे ! म्हणूनच या तारतम्यशून्य लोकांचे हातीं निदान पुढारी-पणाचें तरी हत्यार देऊन उपयोग नाहीं.

प्रस्तुत प्रकरणीं तारतम्य आणि सौष्ठवबुद्धि यांचाच सर्व भाषाकोविद कसा आश्रय करतात हें पुढील एका सर्वमान्य संदर्भग्रंथांतील उताऱ्यावरूनहि स्पष्ट होईलः—

" There are many occasions when an expression in English is not only inadeaqate but even lacking for the rendering of certain ideas" (and hence) "A large class of words exists which have been given ready hospitality whereupon they have acquired a recognised position in the language...So many foreign elements exist in the English language that it makes no fuss over the entry of additional strangers. " (e. g. Seraph, Caravan, Cherub, not to speak of Parliament, Saloon etc... )

याच बाबतींत बेन जॉन्सनचे प्रख्यात धोरण प्रत्येक लेखकानें ब्रीदवाक्य ठरविण्यास योग्य होय.

" *We must not be too frequent with the mint* nor fetch words **from the extreme and utmost ages; but the eldest of the present and newest of the past language is best. "**

ज्यांचा स्वाभिमान सावरकर–पटवर्धन यांच्याहून खासच कमी नाहीं असे

विष्णुशास्त्री चिपळूणकर काय म्हणतात तें आतां पाहा:—" 'इष्टेट', 'पाइंट', 'रजिस्टर' वगैरे पुष्कळ मंजुळ शब्द इतक्यांत घरोघर होऊन बायकांपर्यंत व पोरांपर्यंत सुद्धां गेले आहेत. पण आमचा मुख्य रोख त्यांवर नव्हे. वरील शब्द कितीहि मराठींत आले तरी त्यापासून तीस तादृश भय नाहीं. एक तर ते बोलूनचालून परकीय पडले. तेव्हां त्यांस खुद्द मराठी असें कोणीहि म्हणणार नाहीं व त्यांचीहि तींत घुसण्याची इच्छा नाहीं. शिवाय दुसरें असें कीं त्यांतून कित्येकांचें मराठींत असणाऱ्या शब्दांनीं कामहि होणारें नव्हे. यास्तव लांबलचक नवे शब्द उगीच श्रम घेऊन काढावे त्यापेक्षां हेच कां असेनात ? इंग्रजांस जर आमचे 'खटपट' 'बंदोबस्त' 'पक्का', 'घी' असे शब्द चालतात तर आम्हांसहि 'बुक' 'टेबल' वगैरे शब्द खुशाल चालून घेतां येतील. पण याविषयीं आम्हांस विशेषत: बोलणें नाहीं. तर जे धड इंग्रजी नव्हेत धड मराठी नव्हेत, ज्यांचा अर्थ इंग्रजी आणि उच्चार मराठी, असे अर्धकच्चे मराठींत उतरलेले जे शेंकडो शब्द सध्यां मोठाल्या ग्रंथांतून, मासिकपुस्तकांतून, वर्तमानपत्रांतून, हजारों नवीन तरूण लोकांच्या भाषणांत हमेश आढळतात अशा शब्दांवर आमचें मुख्यत: धोरण आहे."

वरील अभिप्रायावरून प्रस्तुत भाषाशुद्धीच्या वादांत जातिद्वेष अथवा अभिनिवेश याहून तारतम्य, उपयुक्तता व भाषासौष्ठव यांसच सर्व सुज्ञांनीं अग्रस्थान दिलेलें आढळेल. आणि महाराष्ट्र देखील हेंच करीत आला आहे. हा प्रश्न सावरकरपटवर्धनाहून फारच जुना आहे. विष्णुशास्त्र्यांनीं त्याचा विचार करूनहि आपल्या लिखाणांतून फारशी शब्द निवडून काढण्याचा निरुद्योगी व आत्मघातकी उद्योग केला नाहीं. इतर अनेक स्वाभिमानी व देशोद्धारक म्हणून पूज्य झालेल्या लेखकांनींहि फारशीचें योग्य प्रमाण मान्यच केलें; इंग्रजीचेंहि प्रत्येक ठिकाणीं हटातटानें भाषांतर केलें नाहीं; कांहीं ठिकाणीं मूळच्या संपूर्ण अर्थाचा नाद सोडून सोपा पर्याय पत्करला कित्येकदा एका शब्दाचीच कल्पना वाक्यानें सांगितली तर प्रसंगीं मूळ इंग्रजीहि वापरले. आजचेही प्रख्यात नवे जुने लेखक अशा सर्वमान्य व कार्यक्षम शब्दसामुग्रीवरच कार्य चालवीत आहेत. कारण कोणासच सावरकर—पटवर्धन पसरवीत आहेत ती भाषाशुद्धीहि वाटत नाहीं व भाषाहि वाटत नाहीं.

सावरकर मात्र आत्मसंतुष्टतेच्या लहरीवर आरूढ होत्साते " भाषाशुद्धीचीं आंदोलनें " पाहत आहेत. प्रतिभेंतील त्यांच्या लेखांतील पुढील उद्गार पहाः– " आज भाषाशुद्धीस तत्त्वतःच आणि सर्वस्वी प्रतिकूल असा पक्ष मोजण्यासारखा उरलेला नाहीं. अनेक रूढावलेल्या परकीय शब्दांचें उच्चाटन गेल्या दहा वर्षांत झालेलें असून..." इ. इ.

यांतील वल्गना व वंचना यांस तोंड देणें मुष्कील आहे ! कारण त्यांस विरोध करणें म्हणजे भाषाशुद्धि नको म्हटल्याचें पाप लागणार ! आतांपर्यंतचें विवेचन ग्रहण करणारास समजलेंच असेल कीं, आम्ही भाषाशुद्धीच्या विरुद्ध नाहीं. आणि म्हणूनच सावरकर यांच्या, वरील आत्मसंतुष्टतेच्या उद्‌गारांवर आमचें उत्तर म्हणजे " ( १ ) भाषाशुद्धीचा प्रारंभ आपण केला नाहीं. ( २ ) तो वर सांगितल्याप्रमाणें विष्णुशास्त्र्यांपासून झाला. ( ३ ) आपण केलेला उपक्रम भाषाशुद्धीचा नसून शब्दशुद्धीचा अथवा त्याहूनहि वास्तविक म्हणजे शब्दबहिष्काराचा होय. आणि त्याचा स्वीकार एकाहि ग्रंथकारानें किंवा वृत्तपत्रानें केलेला नाहीं. खऱ्या भाषाशुद्धीची चळवळ ह्यापुढें विचारी लोक हातीं घेतील व त्याचा पहिला प्रहार आपल्या बेडौल व दुर्बोध भाषेवर होईल. "

" गेल्या दहा वर्षांत " काय झालें याचें चित्र विस्तारभयास्तव येथें काढतां येत नाही. पण लेखाच्या शेवटीं दिलेल्या उताऱ्यावरून गेल्या पन्नास वर्षांत विचारी लेखकांच्या भाषेंत कांहींच फरक पडला नाहीं असें सहज दिसून येईल. जो फरक पडला तो हुल्लडी व अपक्व लेखकांच्या भाषेंत पडला आणि त्या फरकानें इंग्रजी फारशी शब्द कमी करण्याचें काम मुळींच केलेलें नाहीं. कृष्णशास्त्री आणि केळकर, विष्णुशास्त्री आणि माडखोलकर, लोकहितवादी आणि पोतदार लो. टिळक आणि अत्रे या भिन्न पिढ्यांतील प्रातिनिधिक लेखकांच्या लेखनांतील शब्दसामुग्री **भाषाजातिदृष्ट्या** एकच आहे. सावरकर म्हणतात त्याप्रमाणें उर्दू-इंग्रजीचें आक्रमण कोणासच परतवावें लागलें नाहीं. मध्यें थोडी गडबड उडाली. पण ती **सध्यांच्या एका शुद्धिप्रचारकानें म्हणजे पटवर्धनांनींच उडविली ! आणि तीहि सरोस फारशी शब्द पेरून !!**

एवंच बहुजनसमाज त्यांतहि नव्हता आणि यांतहि नाहीं. इंग्रजी शिक्षणाबरोबर वाढीस लागलेल्या मराठी गद्याची शब्दसामुग्री, लोकहितवादीपासून विद्यमान प्रमुख गद्यलेखक श्री. न. चिं. केळकर यांचेपर्यंत एकच आहे. आमच्या म्हणण्याचा अर्थ असा कीं, कालमानानें भाषा बदलली असेल, पण सावरकर म्हणतात त्याप्रमाणें इंग्रजी शब्दांची धाड परतविण्याकरितां गेल्या दहा वर्षांत भाषा बदलली असें मुळींच नव्हे.

सावरकर म्हणतात त्याप्रमाणें कांहीं घडले आहे कीं काय आणि भाषाशुद्धीवाले शुद्ध लिहितात कीं शुद्धीचें नांवही न घेणारे लिहितात हें स्पष्ट दिसून यावें म्हणून भाषेचे चार नमुने प्रत्यक्षच पाहूं या.

( १ ) " त्या वेळचे ज्यू लोक अत्यंत धर्मवेडे होते. मनुष्य धर्मवेडा झाला म्हणजे त्याला सारासारविचार राहत नाहीं. उज्ज्वल ध्येयाची मातब्बरी वाटत नाहीं, त्याला परधर्मीयांची सुंदर कृति विद्रूप वाटूं लागते. त्यांचे सुंदर बोल कटु लागतात. त्यांच्या उदार धोरणाबद्दल संशय येऊं लागतो. एखाद्या सुंदर घटनेचा विध्वंस करण्याचें महत्पुण्य हेच धर्मवेडे आपल्या पदरीं बांधून घेतात. हा विध्वंस करण्याकरितां परप्रांताच्या लोकांना वाटेल तसें सहाय्य करावयास त्यांना काडीमात्र शरम वाटत नाहीं. पण हा विध्वंस करतांना आपलीहि यांत राखरांगोळी होणार आहे याचेंहि त्यांना भान रहात नाहीं.........

" हजरत महमद पैगंबर जात्याच अतिशय सुंदर होते. सौंदर्याचा उत्कृष्ट नमुना म्हणून मक्केंतील कित्येक लोक त्यांच्याकडे अंगुलीनिर्देश करीत. त्यांचा बांधा मध्यम तऱ्हेचा असून रुंद खांदे, भरदार छाती आणि मजबूत हाडेपर यामुळें ते बरेच सशक्त दिसत. त्यांचा चेहरा तेजस्वी असून त्यावर आत्मविश्वास उमटलेला असे. त्यांची दाढी त्या चेहऱ्याला उठावदार दिसत असे. त्यांच्या डोक्यावरील काळेकुळकुळीत केस मानेवर व्यवस्थित कापलेले असत. भव्य कपाळ, हरिणासारखे टपोर डोळे, चाफेकळीसारखें नाक, कुंदकळ्यांसारखी शुभ्रदंतपंक्ति आणि या सर्वांत उठावदार दिसणारा हंसरा चेहरा यामुळें प्रत्येक माणसावर त्यांची छाप पडत असे. त्यांचे हात स्त्रियांसारखे नरम होते. आणि हातांचीं बोटें बारीक व लांब होतीं. त्यांचा आवाज गोड असल्यामुळें

तासचे तास त्यांच्याशीं संभाषण करीत राहावें असें प्रत्येकास वाटे. ”

वरील शुद्ध, सहज, आणि ठसठशीत भाषा पैगंबराचा अभिमान बाळगणाऱ्या व जन्मभाषा मराठी नसलेल्या **एका मुसलमान गृहस्थांची आहे !**

( २ ) “ वरील सुंदर विवेचनावरून हेंच नाहीं का सिद्ध होत कीं, ओष्ठचुंबन हें सर्व चुंबनप्रकारांत अधिक सुखदायी आहे ? कारण स्पर्शसुख देण्याच्या किंवा घेण्याच्या बाबतींत ओठांची बरोबरी कोणीच करूं शकत नाही. नेत्रचुंबनापासून सुख होईल. पण ओष्ठचुंबनापासून त्यापेक्षांहि अधिक सुख होईल हेंहि वरील विवेचनावरून स्पष्ट होतें. दुसरें असें कीं, नेत्राचें चुंबन घेणाऱ्या व्यक्तीला ओष्ठ हे संवेदनसुलभ असल्यामुळें सुख होत असलें तरी नेत्र हे तितकेच संवेदनसुलभ नसल्याकारणामुळें ज्या व्यक्तीच्या नेत्राचें चुंबन घेतलें जातें त्या व्यक्तीला तितकेंच सुख होणें शक्य नाहीं. यासाठींच ओष्ठचुंबनापासून होणारें सुख उभयनिष्ठ असतें असें वर म्हटलें आहे. ओष्ठचुंबनाच्या या विशेषामुळें सर्व चुंबनप्रकारामध्यें ओष्ठचुंबन हें अधिक सुखदायी आहे असें सिद्ध होतें.—”

प्रस्तुत उतारा कित्येक पिढ्या संस्कृत विद्येचें आगर समजल्या जाणाऱ्या गजेंद्रगडकर घराण्यांतील, संस्कृत व इंग्रजी यांतील नैपुण्याबद्दल सुविख्यात अशा प्रोफेसर **अश्वत्थामाचार्य गजेंद्रगडकर** यांचा आहे. सावरकर--पटवर्धन यांच्या लेखनांतील कृत्रिम संस्कृतचें दडपण यांत दिसत नाहीं ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे.

( ३ ) “आतां हा रूपकालंकार पुरे. हिंदु लोकांचें शौर्य, पराक्रम नाहीसें होऊन हा देश मुसलमानांनीं पादाक्रांत केला. कोणाचा हेतु परदेशांतील संपत्ति लुटून नेऊन आपल्या देशाची भर करावयाची असा असतो. परंतु जी मंडळी इकडे आली तींतील कांहीं लोक शिवाय करून बाकीच्यांनीं आपला देश भरण्याची खटपट कधींच केली नाहीं. ते या देशांत आले ते येथेंच लटकले व येथेंच वस्ती करून राहिले. हा देश विस्तीर्ण, रसाळ आणि सुसंपन्न असल्यामुळें त्यांस येथें बहुत सुख झालें. कालांतराचा फेरा कांहीं विलक्षण आहे. पूर्वीं या देशाचे संरक्षक जे एतद्देशीय क्षत्रिय लोक होते त्यांचें जागीं हे बाहेरून आलेले मुसलमान देशरक्षक झाले. त्यांनीं या देशांतील निर-

निराळे प्रांत आपल्या ताब्यांत घेऊन येथील राज्यभोक्ते ते झाले. परंतु सर्वदा ध्यानांत ठेवण्याची गोष्ट हीच कीं, पदार्थमात्रास, राष्ट्रमात्रास अथवा व्यक्तिमात्रास उन्नतपतनावस्था ही नैसर्गिकच आहे......"

" पांच वर्षांच्या वयाचा राजा, नऊ वर्षांचा दिवाण, सात वर्षांचा फडणीस अशी राज्यमंडळाची स्थिति हिंदुस्थानांत ठिकाठिकाणा असल्याचे दाखले आहेत. त्याचें कारण त्या त्या चिमण्या अधिकाऱ्यांचे वाडवडील व बापजादे त्या त्या अधिकारावर होते म्हणून त्यांचीं त्यांचीं कामें त्यांच्या त्यांच्या वंशाकडेच चालवावयाचीं असा इकडचा दस्तुर आहे. परंतु या वहिवाटीनें एकंदर देशांतील राज्यांस मोठा अपाय होऊन तीं विस्कळीत झालीं व हळूहळू डबघाईस येत चाललीं ! "

वरील उतारा अर्वाचीन मराठींतलि पितामहांपैकीं एकांनीं म्हणजे प्रख्यात लोकहितवादी यांनीं लिहिला आहे.

( ४ ) " सध्यां प्रचलित असलेल्या शिष्ट मराठीचें स्वरूप इंग्रजी अमदानींत ठरलें. पेशवाई काळांतील मराठी भाषेंत फारशी व अरबी शब्दांचा जो बेसुमार भरणा होत होता तो कमी झाला व त्या ऐवजीं संस्कृत शब्द वापरण्यांत येऊं लागले. संस्कृताच्या आश्रयानें आंग्लकालीन मराठीला जें भारदस्त व पोक्त असें स्वरूप प्राप्त झालें तें नवीन इंग्रजी राज्यकर्ते फारशी शब्दांचे द्वेष्टे होते किंवा संस्कृताचे विशेष अभिमानी होते या कारणानें नव्हे. इंग्रजी अंमलाच्या अव्वल अमदानींत विद्याखातें जें स्थापलें गेलें व त्याच्यामार्फत जीं पुस्तकें लिहिलीं गेलीं तीं सर्व पुस्तकें शास्त्री लोकांकडून लिहिलीं गेलीं व त्यामुळें त्यांच्या संस्कृतप्रचुर भाषेचा मराठीवर परिणाम झाला. जांभेकर, तळेकर, चिपळूणकर वगैरे कर्ती मंडळी शास्त्री होती आणि त्यांनीं लिहिलेल्या अनेक प्राथमिक पुस्तकांत उर्दू शब्दांस थारा मिळाला नाहीं. मराठी जुन्या पद्यांत उर्दू शब्द कमीच होते व त्याच भाषापद्धतीचा त्यांनीं स्वीकार केला; यामुळें इंग्रजी सत्तेचें धोरण निवळलेली मराठी लिहिण्याकडे गेलें. "

प्रो. कृ. पां. कुलकर्णी यांच्या या उताऱ्यांतील मतांप्रमाणेंच यांतील फारशी शब्दांच्या प्रमाणाचेंहि रहस्य ( significance ) लक्षांत घेण्यासारखें आहे.

( ५ ) " इंग्रजांनीं हिंदुस्थानांत राज्य कसें मिळविलें......निजामाकडून इंग्रजांना जो मुलूख मिळाला तो इंग्रजांना लढाई केल्याशिवाय मिळाला हें खरें; पण...निजामानें तो त्यांना स्नेही म्हणून खुशीनें बक्षीस दिला नव्हता किंवा इंग्रज हे त्याचे धर्मगुरु किंवा ईश्वरीलीला दाखविणारे फकीर म्हणून त्यांना धर्मादाय दिला नव्हता ! लॉर्ड डलहौसी यांच्या कारकीर्दीत वरीत्न राज्यें बेवारस झालीं म्हणून इंग्रजांनीं तीं खालसा करून आपल्या मुलखास जोडलीं हें खरें आहे. पण अधिराजे किंवा साम्राज्याचे धनी असा आपला हक्क सांगतां आल्याशिवाय इंग्रजांना हीं राज्यें खालसा कशीं करतां आलीं असतीं ? इंग्रज ही कांही मराठ्यांची अवलाद नव्हे कीं ते सातारच्या राजाचे वारस होऊ शकतील ! "

वरील उतारा आजचे अग्रगण्य मराठी गद्यलेखक श्री. तात्यासाहेब केळकर यांचा आहे. यांतील फारशी शब्दाचें प्रमाण व योजनानैपुण्य लक्षांत घेण्यासारखें आहे. विशेषतः ' अवलाद ' शब्दानें या ठिकाणीं केलेले कार्य भाषाशुद्धीच्या कार्याहून आम्हांस तरी मोठें वाटतें !

वरील पांच उताऱ्यांत परकीय शब्दांचा बागुलबोवा न करणाऱ्या जुन्या-नव्या प्रसिद्ध-अप्रसिद्ध, हिंदु-मुसलमान अशा सर्व प्रकारच्या लेखकांच्या गद्यांचे नमुने दिले आहेत. यांतील चार लेखक हयात आहेत. " यांचे गद्य, इंग्रजी आणि उर्दू शब्दांनीं अशुद्ध झालें आहे व त्यांच्या मानानें सावरकर व पटवर्धन यांचेंच गद्य आम्हांस अधिक शुद्ध वाटतें, " असें म्हणणारे लेखक अगर वाचक सांपडणें कठिण ! अशा स्थितींत गेल्या दहा वर्षांत सावरकरांना कोणती क्रांति घडविणें अवश्य वाटलें आणि जी घडली ती कोठें आहे ?

असो. शेवटीं सावरकरांच्या स्वपक्षाच्या वृथागौरवाप्रमाणेंच पटवर्धनांच्या अवास्तव गाऱ्हाण्यांचाहि विचार केला पाहिजे. आणि त्यांनीं स्वतःच्या भूमिकेविषयीं दाखविलेल्या वृथा अनुकंपेचें निराकरण करणें जरूर आहे. रा. पटवर्धन यांस, भाषाशुद्धीच्या व्रतामुळें आपला छळ होत आहे असें वाटत आहे ! पटवर्धन म्हणतात " आपली टवाळी होत आहे हें पाहूनही शिकविणाऱ्यांना त्या गोष्टी शिकविण्याचें व्रत चालू ठेवावें लागतें. " आणि ज्या लेखांत ते आपले हाल वरील करुण शब्दांनीं वेशीवर टांगीत आहेत

**त्यांतच** त्यांचा द्राविडी पंथ न स्वीकारणारांबद्दल ते पुढील दिलदारपणाचे शब्द काढीत आहेत ! ते म्हणतात—

" दळणवळणाचीं अपरिहार्यता वा मराठीची निर्धनता ही या क्रांतिच्या वा उत्क्रांतीच्या मुळाशीं नसून या उत्क्रमणाचा दोष सर्वस्वी आमच्या **शेळपट परधार्जिण्या** अस्वाभाविक मनोवृत्तीकडे आहे. "

अनेक **लोकमान्य लेखकांस शेळपट ठरविणाऱ्या क्रांतिकारांनीं** आपल्या हेमाडपंती वळणापुढें लोकांनीं आरसा धरल्यास ' टवाळी टवाळी ' म्हणून त्रागा तरी करूं नये ! एवंच काय, सावरकरांस दिसत असलेली निर्भेळ मान्यता म्हणजे जेवढा भ्रम, तेवढाच पटवर्धनांस सलणारा छळहि होय ! क्रांतीहि नाहीं, छळहि नाहीं आणि सावरकर म्हणतात तशी विरोधी सैन्यांत दाणादाणहि नाहीं. हुल्लड म्हणून सावरकर-पटवर्धनी वळणाचे शब्द वळीत बसलेल्या नवथर लेखकांचा कान ती तजवीज प्रथम करणें, हें निकडीचें होऊन बसलें आहे. आणि खरी भाषाशुद्धि तूर्त याच बाजूनें करावी लागेल.

प्रस्तुत विवेचन वाचणारास सावरकर-पटवर्धनांच्या भाषाविशेषाप्रमाणेंच प्रचारवैशिष्ट्याचीहि ओळख झालीच असेल. हे दोघेहि पंथप्रवर्तक आग्रही, दीर्घोद्योगी आणि धडाडीचे आहेत. ते जो प्रचार हातीं घेतात त्यांत, राष्ट्राचें कल्याण एकवटलें आहे आणि त्यांच्या विरोधकांच्या ठायीं देशद्रोह आणि शेळपटपणा भरून राहिला आहे असें त्यांस त्यांच्या एककल्ली वृत्तीमुळें सहजच दिसूं लागतें ! आणि यामुळेंच त्यांचे लेख एखाद्या झंझावाताप्रमाणें वाटूं लागतात. त्यांतच दोघांच्या विख्यात आणि आदरणीय व्यक्तिमाहात्म्याची भर पडते ! आणि या सर्व परिस्थितीमुळेंच त्यांच्या ज्वलज्जहाल लेखांस **निर्भीड आणि उघड उत्तर देण्याखेरीज गत्यंतर नाहीं.** म्हणूनच प्रस्तुत महत्त्वाच्या प्रश्नांत कोणी त्यांच्या इतर मान्यतेची भीड धरूं नये.

एरव्ही प्रस्तुत लेखक सावरकरपटवर्धनांविषयीच्या आदरांत कोणाही महाराष्ट्रीयांहून कमी ठरणार नाहीं असें म्हणण्यास त्यास **सात्त्विक अभिमान वाटतो.** दे. भ. विनायकराव सावरकर यांजसारखे तेजस्वी, प्रतिभावान, **पराक्रमी पुरुष कोणत्याहि राष्ट्राचें शिर उन्नत करतील. आणि तूर्त फक्त**

वाङ्मयासंबंधींच बोलावयाचें झाल्यास त्यांच्याएवढी प्रखर तेजस्वी प्रतिभा अर्वाचीन वाङ्मयांत कोणाच्याच वांट्यास आलेली नाहीं. पण कर्तृत्वांत धाडस आणि लेखनांत असामान्य प्रतिभा एवढ्यावरच त्यांचें मोठेपण संपत नाहीं. अर्वाचीन भरतखंडांत ज्या थोड्याच महाभागांनीं एक निश्चित आणि स्पष्ट तत्त्वज्ञान सांगितलें अशा गांधी-टिळकांसारख्या तत्त्वप्रवर्तकांशेजारीं सावरकर यांस त्यांच्या प्रतिकारयोगाच्या तत्त्वज्ञानानें अढळस्थान मिळवून दिलें आहे. आणि हेंच प्रखर आणि दुर्दम्य तत्त्वज्ञान त्यांच्या वाक्यावाक्यांतून निनादत आहे.

श्रीयुत पटवर्धन यांच्या विषयींच्या माझ्या आदराचा येथें निर्देश करण्याचेंहि कारण नाहीं. येथील कित्येक साहित्यभक्तांस माझे त्यांचे संबंध किती जिव्हाळ्याचे आहेत हें ठाऊक असेल आणि प्रस्तुत निबंधांत जेवढ्या स्पष्टपणें त्यांच्या मतांचें खंडन केलें आहे तेवढ्याच स्पष्टपणें मी अनेकवेळां त्यांच्या समक्षहि केलें आहे. यामुळें त्यांचा अथवा कोणाचाहि या लेखामुळें गैरसमज होण्याचें कारण नाहीं.

आणि या दोघां मान्य महाराष्ट्रीयांच्या व्यक्तिमहात्म्यामुळेंच मला महाराष्ट्रीय लेखक-वर्गास एक प्रार्थना केल्यावांचून राहवत नाहीं. हा प्रश्न उपेक्षेचा अथवा दाक्षिण्यप्रदर्शनाचा नाहीं. एखादा शब्द वापरण्यापूर्वीं तो विशिष्ट दोन परकी भाषांतील आहे कीं काय हें पाहण्यास सावरकर-पटवर्धन सांगतात. मी म्हणतों त्याऐवजीं कुठलाहि शब्द बनविण्यांपूर्वीं ( १ ) त्या अर्थाचा शब्द मराठींत पूर्वीं आहे कीं काय ?, ( २ ) मी बनवीत असलेला शब्द किती लोकांस समजेल ? आणि ( ३ ) मी वापरीत असलेल्या भाषेंत तो कितपत शोभतो ? हे प्रश्न लेखकानें स्वतःस विचारावेत.

तसेंच राष्ट्राचे अखिल व्यवहार इंग्रजींत चाललेले आहेत तोंपर्यंत उगीच फावल्यावेळीं हवे त्यानें नवीन शब्दांची टांकसाळ काढून कितपत फायदा आहे याचाहि विचार करावा. सावरकर-पटवर्धन मोठे पराक्रमी आणि उद्योगी पुरुष आहेत. म्हणून नुसत्या मुरवतीखातर त्यांच्या पराक्रमास आपल्या देशभाषेचें मातेरें करूं द्यावें कीं काय ?

वर्तमानपत्रांच्या चालकांना माझी विशेष विनंति आहे. पेशवाईतील फारशीप्रचुर मराठी जशी अव्वल इंग्रजींतील शास्त्रशुद्ध आणि बाळबोध गद्य लिखाणानें निवळवून दिली त्याप्रमाणें आपण आजची प्रत्यही विकृत होणारी भाषा शुद्ध राखून मराठीचें मराठीपण राखलें पाहिजे. आपल्यामागें असलेली मजकुराची निकड प्रस्तुत लेखक जाणून आहे. तसा आपण वेळप्रसंगीं एखादा इंग्रजी शब्द ठेवला तरी चालेल. पण **रोज नवे विक्षिप्त पर्याय** काढूं नका. ते नवीन पर्याय एकमेकांस मारतील आणि जुनें जातिवंत मराठीहि मरेल.

नवीन शब्द बनविण्यापेक्षां योग्य शब्द योग्य ठिकाणीं योजणें यांतच खरें नैपुण्य आहे आणि अर्थगांभीर्यहीन शब्द तयार करण्यांत पुरुषार्थ तर कांहीच नाहीं.

असो. ज्यांस ज्यांस सावरकर आणि पटवर्धन यांची क्लिष्ट भाषा मान्य नसेल ते ते लेखक मराठीचें स्वाभाविक व सुबोध वळण टिकविणें हें आपलें पवित्र कर्तव्य समजतील असा मला दृढ विश्वास आहे.

आतांपर्यंत आपण वाचलेलें विवेचन सावरकर व पटवर्धन यांच्या जहाल लेखांस प्रत्युत्तर म्हणून असल्यामुळें जागजागीं त्यांच्याप्रमाणेंच उपहास व वक्रोक्ति यांचा अवलंब करावा लागला आहे म्हणून माझ्या लेखांतलि प्रमुख सिद्धांतांचा मी सूत्ररूपानें पुनरुच्चार करतों.

( १ ) सांप्रत परकीय शब्दांचें मराठीवर आक्रमण अधिक होत नाहीं.

( २ ) इंग्रजी राज्य असेपर्यंत खासगी व्यवहारांत नकळत इंग्रजी येणें अपरिहार्य आहे.

( ३ ) तरी अशा परिस्थितींतच ग्रंथांतील शुद्ध मराठीची वाढ निर्विघ्नपणें झाली आहे.

( ४ ) परकीय शब्दांपेक्षां धेडगुजरी प्रयोगानेंच कोणत्याहि भाषेची अधिक हानी होते.

( ५ ) असें असून सावरकर–पटवर्धनांची चळवळ मात्र परकी शब्दांपुरतीच आहे. अतएव ती खरी भाषाशुद्धि नव्हे.

( ६ ) फारशीच्या प्राचुर्याचें उच्चाटन इंग्रजी अमलाच्या सुरुवातीसच मराठी लेखकांच्या पहिल्या पिढीनें केलें.

( ७ ) त्या लेखकांच्या भाषेंतील अनेक निर्भेळ मराठी शब्द व सुबोध भाषासरणी यांचा या कृत्रिम, भाषाशुद्धीच्या चळवळीनें घात होत आहे.

( ८ ) युरोपांतील छोट्या छोट्या राष्ट्रांच्या आपसांतील यादवीमुळें विकोपाला गेलेल्या निष्फळ भाषाबहिष्काराचें वळण गिरविण्यानें आपल्या भाषेचें हित होणार नाहीं.

( ९ ) केवळ टूम म्हणून व " प्रत्येक इंग्रजी शब्दास मराठी शब्द नसल्यास भाषेस लांछन आहे " असें समजून नवे शब्द बनविण्याच्या प्रवृत्तीमुळें मराठीचें स्वरूप अलीकडे विद्रूप व हास्यास्पद होत चाललें आहे.

( १० ) खऱ्या भाषाशुद्धीचा रोख आतां या हास्यास्पद शब्दनिर्मितीकडे व धेडगुजरी प्रयोगांकडे वळला पाहिजे.

---

# भाषाशुद्धिवाद्यांची भूमिका

[ या वादांतील दुसऱ्या पक्षाची भूमिकाहि याच पुस्तकांत उपलब्ध व्हावी म्हणून, प्रो. माधवराव पटवर्धन यांनीं रा. क्षीरसागरांच्या मूळ लेखास दिलेल्या उत्तरांतील महत्त्वाचे उतारे उद्धृत केले आहेत.]

'खरी भाषाशुद्धि आणि तिचे खरे वैरी अर्थात् सावरकर आणि पटवर्धन' या मथळ्याचे दोन लेख 'सह्याद्रि' मासिकांत लिहून रावमहाशय श्रीकृष्ण केशव क्षीरसागर यांनीं जिकडेतिकडे आनंदीआनंद करून टाकिला आहे! महाराष्ट्र मोहनिद्रेंतच पडावा आणि त्या अवधींत आपण आपला स्वार्थ पूर्णपणें साधून निर्घोर व्हावें अशी प्रबळ इच्छा ज्यांच्या अन्तःकरणांत खोल दडलेली आहे अशा लोकांचे डोळे, रा. क्षीरसागरासारखा घरचाच मनुष्य हाकाटी करून जागृत आणूं इच्छिणाऱ्यांना गप्प करण्याचा प्रयत्न करीत आहे हें दृश्य पाहून आनन्दाश्रूंनीं भरून आले असतील. कांहीं परकी शब्द वापरण्याची संवय हाडींमासीं खिळल्यामुळें आतां ती सोडण्याचेंच ज्यांच्या जिवावर येत असेल अशा धुरन्धर लेखकांच्या पथ्यावरच रा. क्षीरसागर यांची विचारसरणी पडत असल्याने तेहि त्यांना सानन्द आशीर्वाद देत असतील. ज्यांना तत्त्व-बोधाच्या महत्त्वापेक्षां अमुक व्यक्तींनीं पुढें यावें याचेंच वैषम्य अधिक वाटतें त्यांनाहि सावरकर–पटवर्धनांची झालेली ही सम्भावना पाहून हर्षवायु झाला असेल. भाषाशुद्धीच्या प्रचारकांना तर हा प्रश्न उपेक्षेचा नाहीं एवढें रा. क्षीरसागर मान्य करतात हे पाहून आनन्दच वाटावयाला हवा. त्यांनीं या राष्ट्रीय महत्त्वाच्या चळवळीची नुसती हेटाळणी न करतां कांहीं तरी तत्त्व-निविष्ट विरोध करून तिच्या पुरस्कारास अप्रत्यक्षपणें साह्यच केलें आहे. रा. क्षीरसागरांनीं हे जे दोन लेख सात्त्विक व नव्हे तर तात्त्विक संतापानें लिहिले आहेत ते कांहीं केवळ टाळ्या मिळविण्याकरितां नव्हत. टाळ्यांनीं त्यांचें समाधान होणार नाहीं. त्यांना भाषाशुद्धिवाद्यांची चळवळ हाणून पाडण्याची आहे. त्यांना एकट्यांनाच या सार्वजनिक आनंदाचे वांटेकरी होतां येणार नाहीं असें दिसतें. कारण, उपहास, वक्रोक्ति, हेत्वाभास इत्यादि विविध

अस्त्रांचा भडिमार करूनहि भाषाशुद्धिवादी लोकांचा युक्तिवाद अद्यापि ढांसळून भुईसपाट झाला नाहीं. तो अभेद्य उभा आहे.

लेखनाच्या भरांत दोनतीन ठिकाणीं रा. क्षीरसागर यांच्या हातून माझ्यावर जे निराधार दोषारोप केले गेले आहेत, त्यांचा मुख्य प्रश्नांशीं संबंध नसल्यानें सार्वजनिक मासिकांचीं पानें मी वैयक्तिक समर्थनासाठीं अडवूं इच्छित नाहीं.

विद्रूपशब्दनिर्मितीचा भीषण रोग लेखकांना जडूं पाहत आहे या भीतीनें आणि असा रोग जडला असल्यास त्याचें निर्मूलन झालें पाहिजे या सदिच्छेनें रा. क्षीरसागर यांनी ही यातायात केली आहे. या प्रकरणीं त्यांचा आणि माझा मतभेद नाहीं. जे लोक टूम वा लहर म्हणून शब्दनिर्मिति करतात आणि भाषेंत वा बोलींत विद्यमान असलेल्या शब्दांकडे नेणून वा जाणूनबुजून दुर्लक्ष करतात ते भाषेचें कोणतेंहि हित साधीत नाहींत, त्यांतून त्यांनीं निर्माण केलेले शब्द जर उच्चारकठिण आणि दुर्बोध असतील तर हे शब्दनिर्माते भाषेचा खेळखण्डोबाच करीत आहेत असें म्हटलें पाहिजे. भाषेंतील प्रत्ययोपसर्गांचा उपयोग करून नवनवे शब्द साधीत राहिल्यानें भाषेची सर्गशक्ति तितकी जिवंत राहते हें खरें; पण या लहरी जर ज्याला येऊं लागल्या तर प्राचीन शब्दसंपत्तीचा नाश होऊन पुन्हां वर भाषेचें एकजातित्व आणि सातत्य हीं नष्ट होतील हेंहि कांहीं खोटें नाहीं.

परंतु या विद्रुपशब्दनिर्मितीच्या रोगाचें जें निदान रा. क्षीरसागर यांनीं केलें आहे तें चुकीचें आहे. शब्दनिर्मितीचा हा रोग कित्येकांना भाषाशुद्धीचें नांव निघण्याच्या आधींपासूनच जडलेला आहे.

* * *

भाषाशुद्धिवादी लोक जे नवीन शब्द निर्माण करीत असतील ते टाकाऊ असतील परंतु तेवढ्यानें त्यांचा युक्तिवाद टाकाऊ ठरत नाहीं. त्यांचें आद्यकर्तव्य अमुक शब्दापेक्षां तमुक शब्दांना अधिक जवळ करा, अमुक शब्दांच्यावर बहिष्कार टाका अेवढेंच पटवून देण्याचें आहे. त्यांची विचारसरणी भ्रामक असल्यास बिनतोड युक्तिवादाने ती खोडून काढा; परंतु बहिष्कार्य गोष्टी

काढून टाकिल्या असतां होणारी अडचण दूर करण्याचा बोजा त्यांच्याच अङ्गावर टाकणें हें कांहीं त्यांच्या चळवळीस समंजसपणाचें उत्तर नव्हे. विदेशी कापड वापरूं नये हें सप्रमाण सिद्ध करणाऱ्याला सूतहि काढितां येत नसेल; तो परदेशी गिरण्यांपुढें आपली टकळी काय चालविणार ? तो जी अुणीव उत्पन्न करीत असतो ती समाधानकारक कापड काढून दूर करणें आणि पेठ पटकावून टाकणें हें कापडाची निर्मिति करणाऱ्यांचें काम आहे. भाषेचा संबंध प्रत्येकाशींच थोडा तरी येत असल्यानें भाषाशुद्धिवादी लेखकाला आपल्या स्वतःच्या अडचणी भागविण्यापुरती, तत्त्वाप्रमाणें कृति करण्यापुरती तरी नवीन शब्दांची निर्मिति करावीच लागते. लालित्याकडे लक्ष देऊन त्याने ती निर्मिति न केली तर गम्मतबघे टीकाकार लोकांना ब्रह्मज्ञान सांगणारा कोरडा पाषाण पाहा म्हणून त्याची सम्भावना करतात आणि त्यानें ती शब्दनिर्मिति केली तर क्षीरसागरांच्यासारखे लालित्यलोलुप रसिक त्यांच्यावर हत्यार धरितात ! भाषाशुद्धिवाद्यांच्या टांकसाळींतील नाणीं बेडौल आणि दुर्बोध असतील. रा. केळकर आणि प्रो. फडके यांच्यासारखे प्रसन्न मराठी लिहिणाऱ्यांनी तर टांकसाळी काढायला कोठें प्रतिबन्ध नाहींना ? ते आपलें कर्तव्य विसरतात म्हणुन भाषाशुद्धिवाद्यांच्यावर आग पाखडणें हें फिरोजशाह मेहता यांच्या वेषाच्या मानानें विष्णु गोविंद विजापूरकर यांचा वेष ' बेडौल विद्रूप आणि दुर्बोध ' होता म्हणुन त्यांची टवाळी करण्याइतकेंच समंजसपणाचें होईल. लालित्य आणि सौंदर्य हें कोणाला नको आहे ? त्याला भाळून कोण जात नाही ? त्याच्या पायीं अनर्थ करायला प्रवृत्त होत नाहींत असे किती निघतील ? विजापूरकरांच्या वेषाचें रहस्य कळायलाच दुर्मिळ अशी सुन्दर मनोवृत्ति लागते.

* * *

महाराष्ट्रांत मराठी भाषेंत सतराव्या शतकापर्यंत कांहीं क्रांति होऊन गेली. तिच्या उलट क्रांति करायला हातीं सत्ता आली असतांना उत्कृष्ट संधि लाभली होती पण तेव्हां बुद्धि सुचली नाहीं. इंग्रजी राजवटींत उलट दिशेनें थोडी क्रांति झाली ती अप्रत्यक्षपणें आणि अहेतुकपणेंच झाली; आणि म्हणूनच ती योग्य प्रमाणांत झाली नाहीं. अेकीकडे अिङ्ग्रजी

भाषेला पहिल्या प्रतीचें महत्त्व मिळालें आणि दुसरीकडे संस्कृताच्या अभ्यासाला अुत्तेजन मिळालें आणि या दोन कारणांनीं अुलट दिशेनें योग्य ती क्रांति कांहीं प्रमाणांत घडून आली. ही घडून येत असतांना ज्या लेखकांनीं आधुनिक वाङ्मय निर्माण करून महाराष्ट्राला नवीन सामर्थ्याची जोड करून दिली त्यांनीं जर मराठी भाषेच्या स्थित्यंतराचा खोल विचार करून स्वावलम्बन आणि स्वाभिमान यांच्या दृष्टीनें मराठी भाषेचें स्वरूप कसें असावें याविषयीं कांहीं मत ठरविलें म्हणजे सहेतुकपणें क्रांति केली असती तर आज भाषाशुद्धीचा प्रश्न निघालाच असता. आजहि वाङ्मयाच्याद्वारीं लोकांच्या अंतःकरणाचा ठाव घेणाऱ्या लेखकांच्या हातीं ही अप्रत्यक्ष सत्ता आहे. त्यांनाहि ही दृष्टि नाहीं. लोकप्रियता आणि पैका यांच्या पलीकडे त्यांना कांहीं दिसत नाहीं वा पाहण्याची आवश्यकता वाटत नाहीं अशा वेळीं सावरकरांनीं आपलें अेकाण्डें बंड चालू न ठेवावें तर काय, 'मला काय त्याचें ?' म्हणून खालीं मान घालून राम राम म्हणत बसावें ?

रा. क्षीरसागर म्हणतात कीं ही भाषाशुद्धीची चळवळ आम्हांला वाटत आहे स्वभाषेची, पण वस्तुतः आहे परकीय भाषेसंबंधीं तिरस्कार दाखविण्याची ! असा आक्षेप स्वदेशांत स्वकीयांनीं काढावा आणि त्याला उत्तर द्यावें लागावें ही एकच गोष्ट आम्ही अद्यापिहि कसे अस्वाभाविक विकृत स्थितींत आहोंत हें सिद्ध करण्यास पुरेशी आहे. असाच आक्षेप परदेशी मालाच्या बहिष्काराविरुद्ध घेण्यांत येत असें. परन्तु बहिष्काराचें खरें स्वरूप दाखविणारी एक कसोटी आहे..जे अिङ्ग्रजी वस्तु न घेतां आपली लालित्याची लालसा जर्मन वा जपानी वस्तु घेऊन पुरवितात त्यांनी घातलेला इंग्रजीवरील बहिष्कार हा तात्पुरता देशाच्या थोडा उपयोगीं पडला तरी तो मूलतः सदोषच असतो. जे लोक आपला स्वतःचा देश स्वावलम्बी नि सुसम्पन्न व्हावा आणि उद्योगधन्दे मिळून आपल्या देशबान्धवाचें पोट भरावें म्हणून वैयक्तिक अडचणी सोसून स्वदेशी वस्तूंचा पुरस्कार करतात, आणि तो पुरस्कार व्हावा म्हणून अिंग्रजीच नव्हे तर कोठीलहि परदेशी माल घेत नाहींत त्यांनीं घातलेला बहिष्कार हा खरा सात्त्विक आणि निर्दोष बहिष्कार

होय. हा द्वेषमूलक नसतो प्रेममूलक असतो. आमची भाषाशुद्धीची चळवळ अशीच प्रेममूलक आहे.

आम्हांला परकीय भाषांचा तिरस्कार मुळींच वाटत नाहीं. मी स्वतः अनेक परकी भाषा शिकलों आहें, शिकवीतहि आहें. त्या भाषेतील उत्कृष्ट वाङ्मय ज्यांनी निर्माण केलें त्यांच्याविषयीं मला पूज्य भाव वाटतो. तसें थोडें वाङ्मय झळझळीत भाषान्तराच्या द्वारा मराठींत आणण्याचा प्रयत्नहि मीं केला आहे आणि असें भाषान्तराचें कार्य करण्यांत मला कांहींच हीनत्व वाटत नाहीं. तेव्हां परभाषांचा तिरस्कार कोठें राहिला? तो दाखवायाचा तरि कोणाला? ज्यांना दाखवायचा असें क्षीरसागरांना वाटत असेल ते आप-आपल्या मार्गांनी मराठ्यांची वा इतरांची यत्किंचितहि काळजी न करितां आपली आणि आपल्या भाषेची प्रगति करून घेत आहेत. त्या प्रगतीला भाषाशुद्धीवाल्यांचा विरोध अगदीं नाहीं. आम्हांला आमची आणि आमच्या भाषेची प्रगति आमच्या मार्गानें करण्याचें स्वातंत्र्य पाहिजे आहे.

आम्ही भाषाशुद्धिवादी लोक अिङ्ग्रजी भाषेचें उदाहरण नेमकें विचारांत घेत नाहीं याचें कारण तें आमचा युक्तिवाद ढांसळून पाडील हें असावें असें रा. क्षीरसागर यांना वाटतें. दृष्टांतासाठीं घ्यावयाच्या गोष्टींत साधर्म्य पाहिजे ही साधी गोष्ट ते विसरतात. परंतु अिंग्रजी भाषेचाहि विचार मी येथें करून टाकतों. अिंग्रजी भाषेंत ग्रीक, लॅटिन, फ्रेंच आणि अँग्लोसॅक्सन अशा चार भाषांतील शब्द आहेत. परंतु या शब्दांशीं अिंग्रजी लोकांचें नातें कसें आहे हें पाहणें महत्त्वाचें आहे. ज्या लोकांची मातृभाषा लॅटिन् होती त्या रोमन लोकांची सत्ता अिंग्लंडांत अत्यंत अल्पकाल टिकली. खिस्ती-धर्माच्या प्रसारानंतर खिस्तीधर्माची म्हणजे अिंग्रजांच्या स्वधर्माचीच भाषा म्हणून त्यांचा तिच्याविषयीं एक प्रकारचा आपलेपणा राहिला. कांहीं ग्रीक शब्द आले ते लॅटिन भाषेच्या द्वारां म्हणजे लॅटिन होऊन आले. शास्त्रीय परि-भाषा सिद्ध करण्यास लॅटिन आणि ग्रीक या भाषा युरोपांतील सर्वच शास्त्र-ज्ञांस सोयीच्या असल्यामुळें शास्त्रज्ञांनीं त्या भाषांतून हवें असलेल्या अर्थाचे नवे शब्द निर्माण करून घेतले. या पारिभाषिक संज्ञांचा बहुजनसमाजाच्या भाषेशीं फारसा संबंध येत नाहीं; तथापि ही परिभाषा निर्माण करण्यांत

अिंग्रजी लोकांचा हात नव्हता अशी स्थिति नसल्यानें इंग्रजांना या ग्रीक आणि लॅटिन पारिभाषिक संज्ञांविषयीं परकेपणा वाटण्याचें प्रयोजनच नाहीं.

आतां फ्रेंच आणि ॲंग्लोसॅक्सन या भाषांतील शब्दांचा विचार करूं. हे बहुजनसमाजाच्या बोलींतहि संमिश्र आणि एकजीव झालेले आहेत. रा. क्षीरसागर मोठ्या आवेशानें विचारतात, "पार्लमेंट हा शब्द शुद्ध इंग्रजी नाहीं म्हणून त्यास कोशांत स्थान नाहीं असें पटवर्धन दाखवूं शकतात काय ? ते तसें करूं शकतील तरच इंग्रजी भाषा शुद्धिवाद्यांच्या सिद्धांतास पोषक आहे असें ठरेल." परंतु पार्लमेंट हा शब्द ॲंग्लोसॅक्सन नसला तरी शुद्ध अिंग्रजीच आहे. तेव्हां त्याला अिंग्रजी कोशांत स्थान कां नसावें ? इंग्लंडांत असे जनसमूह आहेत काय कीं जे ॲंग्लोसॅक्सन वा नॉर्मन शुद्ध रक्ताचे असून अलग अलग राहतात आणि त्यांच्यांत शरीरसंबंध झालेले नाहींत आणि होतहि नाहींत ? इंग्लंडमध्यें राजसत्ता ही अमुक एक वर्गाच्या हातीं आहे काय कीं त्या वर्गाच्या भाषेविषयीं अितरांना वैषम्य आणि परकेपणा वाटावींत ? नॉर्मन जेते आणि ॲंग्लोसॅक्सन जित अशी स्थिति प्राचीनकाळीं असली तरी धर्मैक्यामुळें जेते आणि जित यांच्या रक्तांचें हळूंहळूं मिश्रण होत गेलें. प्रत्येकाच्या रक्तांत निरनिराळ्या भाषा बोलणाऱ्यांचा अंश आल्यानें अिंग्रजी भाषेंत त्या त्या भाषांतून शब्द आले त्यांत मानहानि वाटण्याचें कांहीं कारणच नाहीं. तरीसुद्धां चॉसरविषयीं लिहितांना मिल्टन त्याला, 'न विटाळलेला शुद्ध इंग्रजीचा झरा' असें म्हणतोच. कारण, त्या काळीं नॉर्मन आणि सॅक्सन यांचें संमिश्रण पूर्ण झालें नव्हतें. विद्वानांनीं आणलेल्या लॅटिन शब्दांना मागें सारून मागें पडलेल्या ॲंग्लोसॅक्सन शब्दांचा टेनिसनपर्यंत ज्या लेखकांनीं पुरस्कार केला त्यांचा लेखकांनीं आणि लोकांनीं गौरवून सत्कार केला. राजकर्ते नॉर्मन आणि एतद्देशीय ॲंग्लोसॅक्सन हे लोक एकजीव झाल्यावर जी अिंग्रजी भाषा निर्माण झाली तिच्यावर परचक्र कधींच आलें नाहीं. इंग्रज जेथें जेथें आपली भाषा घेऊन गेले तेथें ते जेते म्हणून वा यशस्वी व्यापारी म्हणून गेले. दळणवळणामुळें जे कांहीं परकी शब्द अिंग्रजींत आले ते त्यांना व्यापारांतल्या लाभासारखे वा खण्डणीसारखे भूषणावह झाले; आणि अिंग्लंड देशांत अिंग्रजांचेंच गेलीं ४०० वर्षें सतत

आणि संपूर्ण स्वराज्य राहिल्यामुळें भाषेची वाढ स्वाभाविकपणें होत गेली- स्वाभिमान आणि स्वत्वसंरक्षण याचें बाळकडूच त्या लोकांस मिळालें अस. त्यानें स्वत्वसंरक्षणहि आपोआप होत आलें आहे. अिंग्रजींत भाषाशुद्धीची चळवळ झाली नाहीं. कारण त्या चळवळीची त्यांना आवश्यकताच नव्हती. परंतु यावरून अिंग्रजी भाषेंत हें अनिर्बन्ध व्यापाराचें आणि दळणवळणाचें धोरण यावच्चंद्रदिवाकरौ राहील असें मात्र कोणीं समजूं नये. खुल्या व्यापारापासून अिंग्लंडचा लाभ होण्याचा थांबतांच अिंग्लंडनें आपलें धोरण फिरविलें; परंतु हिंदुस्थानांत स्वदेशी अुद्योगधंद्यांची वाढ होण्यासाठीं संरक्षक करांची आवश्यकता असूनहि कित्येक वर्षें आमच्यांतलें पढतविद्वान्, खुला व्यापार हेंच आर्थिक समुन्नतीचें सनातन आणि चिरंतन तत्त्व आहे म्हणून बरळत असत.

महाराष्ट्रांत जर सुदैवानें स्वराज्य असतें, स्वराज्याच्या मोकळ्या वातावरणांत अव्याहत ४०० वर्षेपर्यंत जर मराठीची वाढ होत आली असती, महाराष्ट्रांत जर अितर भाषा बोलणारांचा सवता सुभा नसता, त्या लोकांची दृष्टि महाराष्ट्राबाहेर आणि हिंदुस्तानाबाहेर जर सारखी लागलेली नसती, मराठी लोकांच्या हातीं ज्या १००।१२५ वर्षांच्या अवधींत खरी सत्ता होती तेव्हां त्यांनीं भाषेचें राष्ट्रीय महत्त्व ओळखून तिचें जर योग्य पालनपोषण केलें असतें, आमच्या वृत्तींत आपलें तें वाअीट आणि दुसऱ्याचें तें चांगलें मानण्याची अस्वाभाविक प्रवृत्ति आणि स्वकीयांच्या वर्चस्वाविषयीं असहिष्णुता आणि परकीयांचें वर्चस्व मानण्याची तत्परता इत्यादि दुर्गुण हाडींमासीं खिळलेले नसते तर मराठी भाषाशुद्धीचा प्रश्नच उपस्थित झाला नसता; आणि तसा तो कोणीं केला असता तर मीच त्याला आधीं विरोध केला असता. परंतु महाराष्ट्राच्या अस्वाभाविक स्थितींत मराठीचें स्वत्व टिकविण्यासाठी जर भाषादृष्ट्या अस्वाभाविक असे प्रयत्न करण्यांत आले तर त्यांत गर्ह्य, अग्राह्य आणि अस्वाभाविक असें काय आहे ?

*　　*　　*

रा. क्षीरसागर यांनीं उपस्थित केलेल्या दोन आक्षेपांचें असे खंडण केल्यावर आणि नवशब्दनिर्मितीच्या धोरणासंबंधीं त्याचें माझें किती मतैक्य आहे हें दाखविल्यानंतर विरोध कोठें येतो तें पाहूं.

ते म्हणतात, नवशब्दनिर्मिति कां करूं नका तर जुने मराठी शब्द मरतात म्हणून. मी तरी काय म्हणतों ? कोणाच्याही परक्या बोलींत नवा शब्द दिसला कीं, हुरळून जाऊन त्याला जवळ करण्याची वृत्ति सोडून द्या, कां तर याच वृत्तीनें मराठीचे शेंकडों शब्द मेले आहेत, आणि शेंकडों मरणोन्मुख झाले आहेत. मराठी शब्द मरूं नयेत हीच सदिच्छा दोघांची आहे. "भाषा हें संस्कृतीचें अेक अङ्ग आहे आणि संस्कृतिवर्धनाचें साधन आहे; अतअेव भाषेसम्बन्धींसुद्धां जागरूक राहिलें पाहिजे" असें स्वतः क्षीरसागरच म्हणतात. आम्ही तरी हेंच सांगतों.

* * *

मराठीवर अितर भाषांचें आक्रमणंच नाहीं असें जे म्हणतात त्यांनीं खोल विचार केलेला नाहीं असें मोठ्या कष्टानें म्हणावें लागतें. अमुक अमुक परकी शब्द वापरावयाचे नाहींत असा जेव्हां मीं निश्चय केला तेव्हांच त्या अर्थाचे पूर्वींचे मराठी शब्द मला आठवूं लागले असा माझा अनुभव आहे. नेहमीच्या व्यवहारांतलेच दोन शब्द खुशाल आणि खुशाली हे घेऊं. हें शब्द वापरावयाचे नाहींत असें मीं ठरविलें तेव्हांपासून माझ्या भाषणांत आणि लेखनांत सुखरूप, क्षेम कुशल हे शब्द येऊं लागले; पूर्वीं ते शब्द येत नसत. सुखरूप पोंचणें या अन्वयांत सुखरूप शब्द अनेकदां वापरला जातो हें मला ठाअूक आहे; पण सुखरूप आहों, आपली सुखरूपता कळवावी असें कांहीं कोणी म्हणत नसेल. तसेंच खुशाल जा याच्या ठिकाणीं सुखेनैव जा, निर्भयपणें जा असें क्वचितच कोणी म्हणत असेल. फार्शी भाषा बोलणाऱ्यांचा आणि आपला सम्बन्ध आला त्याच्या पूर्वीं या अर्थाचा वाक्प्रयोग करण्याची आवश्यकताच पडत नसे असें तर या भाषाशुद्धिविरोधकांचें मत नाहीं ना ? जर कांहीं तरी वाक्प्रयोग होता तर तो नष्ट कां आणि कशानें झाला ?

स्वतः क्षीरसागर 'कमालीची कृत्रिम,' 'कमालीचा हास्यास्पद' असे म्हणून 'कमालीचा' हा शब्द दोनदां वापरतात. 'पराकाष्ठेचा' हा मराठी शब्द त्यांना एकदाहि कां सुचूं नये ? जबाबदार, बेजबाबदार हे शब्द त्यांना सारखे आठवतात; विचारी, अविचारी हे शब्द कां आठवूं नयेत ? जबाबदार या शब्दांत उत्तरदायित्वाची छटा कितीवेळां अभिप्रेत असते ? ज्या

कारणासाठीं मातृप्रसूतिगृह न म्हणतां प्रसूतिगृह म्हणणें योग्य वाटतें त्याच कारणासाठीं 'परिणाम विचारी' न म्हणतां 'विचारी' म्हणणें योग्य वाटलें पाहिजे.

*　　　*　　　*

रा. क्षीरसागर म्हणतात कीं "कुशल लेखक जेथें कृपा वापरील तेथें मेहेरबानी वापरलीच असें नव्हे, आणि जेथें प्रेम वापरील तेथें मोहबत कधींच वापरणार नाहीं" आणि म्हणून "जे शब्द घड मूळ शब्द घालवीतहि नाहींत आणि फारसा महत्वाचा अर्थ, नवीन अर्थ अथवा नाद मराठी शब्दसङ्ग्रहास देतहि नाहीत" अशा शब्दांनाहि ते अजागलस्तनाप्रमाणें निरर्थक समजत नाहींत. परंतु असाच शब्दांनीं मराठीच्या अङ्गणांत दाटी केली आहे. प्रेम आणि मोहबत यांच्यांत सूक्ष्म भेद दाखवितां येईल. तसा प्रेम आणि स्नेह यांच्यांतहि दाखवितां येईल. तेवढ्यासाठी मोहबत हा शब्द अपरिहार्य होतो असें नाहीं. कृपा आणि मेहेरबानी यांत मला तर कांहींच अंतर दिसत नाहीं. शेवटचा निर्णय न म्हणतां 'अखेरचा निर्णय' म्हणण्यांत अर्थाची कोणती सूक्ष्म छटा रा. क्षीरसागर यांनीं व्यक्त केली ?

*　　　*　　　*

रा. क्षीरसागरांनीं आपल्या लेखांच्या शेवटीं लोकमान्य लेखकांचे अुतारे देअून सावरकरांचा आशावाद निराधार आहे हे सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. माझा आशावाद सावरकरांच्यासारखा दुर्दम्य नसल्यामुळें मला या प्रश्नाविषयीं कांहीं लिहितां येत नाहीं. भाषाशुद्धीच्या चळवळीला यश आलेलें नसलें, आणि यावयाचे नसलें तरीहि कर्तव्य कांहीं सोडतां येत नाहीं. तेव्हां नरसोपंत केळकर यांच्या अुताऱ्याची तेवढी छाननी करून हें लांबलेलें अुत्तर संपवूं.

या तेरा ओळीच्या उताऱ्यांत फार्शी शब्द दहा आहेत. या **दहांपैकीं एक तरी अपरिहार्य आहे का ?** या दहा फार्शी शब्दांच्या ठिकाणीं मागें पडत चाललेले मराठी शब्द घालून हाच उतारा कानाला कसा लागतो पाहूं या.

"इंग्रजांनीं हिंदुस्थानांत राज्य कसें मिळविलें ? निजामाकडून इंग्रजांना जो प्रदेश मिळाला तो इंग्रजांना लढाई केल्यावांचून मिळाला हें खरें, पण निजामानें तो त्यांना स्नेही म्हणून प्रसन्न होऊन भेट म्हणून दिला नव्हता; किंवा इंग्रज हे त्याचे धर्मगुरु किंवा ईश्वरीलीला दाखविणारे महन्त म्हणून धर्मादाय दिला नव्हता ! लार्ड डलहौसी यांच्या राजवटींत बरींच राज्यें दायादशून्य झालीं म्हणून इंग्रजांनीं तीं बळकावून आपल्या राज्यास जोडलीं हें खरें आहे. पण अधिराजे किंवा साम्राज्यांचे घनी असा आपला अधिकार सांगतां आल्यावांचून इंग्रजांना हीं राज्यें आत्मसात् कशीं करतां आलीं असतीं? इंग्रज कांहीं मराठ्यांच्या बीजाचे नव्हत कीं ते सातारच्या राजाचे दायाद होऊं शकतील ? "

या उताऱ्याचें मूळ स्वरूप फार्शी शब्द घालून सिद्ध करा असा प्रश्न विद्यार्थ्यांच्या प्रश्नपत्रिकेंत घालून त्यांनीं दिलेलीं उत्तरें वाचणें मनोरञ्जक आणि उद्बोधक होईल. या स्वरूपांत हा उतारा कर्णकटु लागतो का, बेडौल दिसतो कां ? दायादशून्य या एकच शब्दापाशीं कांहीं लोक ठेचाळ-तील, पण जेथें अक्कलशून्यासारखा विजातीयांचा समास चालतो तेथें दायाद-शून्य कां चालूं नये ? कोल्हापुराकडील बोलींत नष्टांश हा शब्द आहे, पण तो महाराष्ट्रांत कदाचित् सर्वत्र समजणार नाहीं. रा. क्षीरसागर म्हणतात कीं 'इङ्ग्रज ही कांहीं मराठ्यांची अवलाद नव्हे' असें वाक्य लिहून अव-लाद शब्दानें या ठिकाणीं रा. केळकर यांनीं जें कार्य केलेलें आहे तें भाषा-शुद्धीच्या कार्याहून मोठें आहे ! अवलाद या शब्दांत हीनतेचा ध्वनि आहे, त्या ध्वनीचें या ठिकाणीं कांहीं प्रयोजन नाहीं. तो ध्वनि मनांत वागवून रा. केळकर यांनीं शब्दयोजना केली असेल तर त्यांच्यावर निष्कारण अनु-दारपणा दाखविल्याचा आरोप येतो; आणि त्या ध्वनीकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें असेल तर रा. केळकर हे जितक्या मार्मिकपणानें कलावन्तानें शब्द-योजना केली पाहिजे तितक्या मार्मिकपणें शब्द योजना करीत नाहींत असें म्हणणे प्राप्त होतें !

परकी शब्द मराठींत निष्कारण कसे उपयोगांत येतात हें तर या उता-ऱ्यावरून दिसलेंच. आणखीहि एक चमत्कार पहाण्यासारखा आहे. 'शिवाय'

हा शब्द ' वाचून ' या अर्थी दोनदां योजण्यांत आला आहे. या शब्दानें ' वांचून, विना, विणें ' या शब्दांना मागें रेटिलेलें नसतें तर अेकदां तरी त्यांचा अुपयोग सहजगत्या झाला नसता कां? परंतु अशा रीतीनें मागें पडत चाललेल्या शब्दांच्याकडे बोट दाखविलें कीं आम्हांला त्यांची आठवण आहे असें म्हणायचें आणि त्यांची नेमणूक करण्याचा प्रसंग आला कीं त्यांना नेमकें विसरून, विदेशी शब्दांची वरणी लावून आपलें विश्वव्यापी प्रेम व्यक्त करावयाचें अशी आमच्या लेखकांची अभिजात रीति आहे !

* * *

परकी शब्दांचा स्वीकार हा मराठी शब्दांच्या नाशाला कारणीभूत होतो असा अनुभव आहे म्हणून परकी शब्द नकोत. अडचण भासेल, नवीन एखादी गोष्ट भाषेनें व्यक्त करावयाची असेल तेथेंहि स्वभाषेंतील शब्दांचा, आणि प्रत्ययोपसर्गांचा अुपयोग केल्यानें म्हणजे स्वावलम्बनपूर्वक कष्ट केल्यानें भाषेचा पराक्रम वाढतो म्हणून परकी शब्द न घेतां नवीन शब्दांची निर्मिति केली पाहिजे. भाषाशुद्धिवाद्यांची भूमिका थोडक्यांत ही अशी आहे.

---

# माझ्या भूमिकेचा पुनरुच्चार

"खरी भाषाशुद्धि आणि तिचे खरे वैरी अर्थात सावरकर आणि पटवर्धन" हा मीं शारदा मंदिरापुढें वाचलेला निबंध सुमारें सात महिन्यांपूर्वी सह्याद्रींतून प्रसिद्ध झाला. तेव्हांपासून त्या लेखाचे अनुकूल प्रतिकूल प्रतिध्वनि वर्तमानपत्रें, मासिकें आणि परिषदा यांतून निघत आहेत. सावरकर–पटवर्धन यांनीं चालविलेल्या विशिष्ट तऱ्हेच्या भाषाशुद्धिच्या चळवळीस महाराष्ट्रांत पुष्टि कधींच मिळालेली नव्हती. तरी त्यांच्या विचारसरणींचें सशास्त्र खंडन कोणीच केलें नाही अशी त्यांची तक्रार होती. आणि माझ्या लेखांचा उद्देश अर्थात् ही त्यांची तक्रार दूर करणें हाच होता. माझे मुख्य आक्षेप पुढीलप्रमाणें होतेः—(१) हे दोघे प्रसिद्ध लेखक म्हणतात त्याचप्रमाणें आधुनिक मराठी लेखक परकी शब्दांनीं हुरळून जात नाहीत; (२) अस्वाभाविक मार्गांनीं शिरलेल्या फारशी शब्दांचें उच्चाटन गद्यलेखकांच्या पहिल्या पिढीनें मागेंच केलें आहे; (३) मराठींत शेंकडों वर्षें रूढ असलेल्या प्रत्येक फारशी शब्दानें समानार्थी मराठी शब्द मारला आहे हा सावरकर–पटवर्धन यांस केवळ प्रचारांधतेमुळें झालेला भ्रम आहे.

याखेरीज भाषेचें शुद्धीकरण (करावयाचेंच म्हटल्यास) करण्यास सावरकर आणि पटवर्धन यांजसारखे तऱ्हेवाईक भाषा लिहिणारे कसे सर्वस्वीं अपात्र आहेत हें दाखविण्याकरितां त्या दोघांच्याहि भाषेतील दुर्बोध आणि मिशनरी वळणाचे प्रयोग मी दाखवून दिले होते. तसेंच शिवाजी, चिपळूणकर आणि युरोपांतील कित्येक राष्ट्रें यांनीं हीच चळवळ केलेली आहे हीं सावरकर–पटवर्धनांचीं विधानें कशीं सपशेल निराधार आणि अप्रस्तुत आहेत हेंहि सिद्ध केलें होतें.

माझ्या प्रमाणावलीपैकीं पहिला भाग हाच या वादाचा मूलभूत भाग होय. तथापि या मूलभूत आक्षेपाच्या बाबतींत पटवर्धन–सावरकरांच्या लेखांत कांहींच उत्तर मिळत नाहीं, ही निराशेची गोष्ट आहे. अर्थात् या बाबतींत मूळ लेखांत केलेल्या विधानांचा पुनरुच्चार करण्याची कंटाळवाणी कामगिरी माझ्याकडे आली आहे. तरी तसें करतांना थोडी अधिक उघड प्रमाणें

देऊन शंकितांचें शंकानिवारण करणार आहे. पहिली आणि सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे "**मेहेरबानी**" या शब्दानें "**कृपा**" हा शब्द, अथवा "**कमाल**" शब्दानें "**पराकाष्ठा**" शब्द मारला असें म्हणणें केवळ कविकल्पना होय व असें असून रा. पटवर्धन या असत्य गोष्टींचा वस्तुस्थिति म्हणून पुनः पुनः उच्चार करीत आहेत हें त्यांच्या शास्त्रशुद्ध विचारसरणीस लांछन होय. "कमाल" शब्दाऐवजीं "पराकाष्ठा" शब्द क्षीरसागर यांस आठवला नाहीं असें रा. पटवर्धन म्हणतात व लगेच तो शब्द मेला, मारला गेला असेंहि समजतात ! या सर्व प्रकारास भ्रांतीशिवाय दुसरें नांव नाहीं. कारण मराठींतील कोणताहि लेखक "पराकाष्ठे" बद्दल "कमाल" वापरीत नसून पराकाष्ठा आणि कमाल दोन्ही शब्द वापरतो; कृपा आणि मेहेरबानी हे दोन्ही शब्द वांपरतो. अर्थात् हें सर्व मीं माझ्या मागील लेखांत इतक्याच स्पष्ट शब्दांत म्हटलें होतें.

इतक्यांतून रा. पटवर्धन यांस कमाल शब्द वापरलेला दिसतांच पराकाष्ठा शब्द मेला असें म्हणून आक्रोश करावयाचा असल्यास नाइलाज आहे—निरुपाय आहे. रस्त्यांत एक मुसलमान दिसतांच त्याच्या शेजारीं जिवंत उभा असलेला एक हिंदु मेला असेंहि वाटल्यास त्यांनीं समजावें ! पण प्रत्यक्ष वादभूत कमाल शब्दाबद्दल पुरावाच हवा असल्यास, अनेक सर्वमान्य ग्रंथांत कमाल आणि पराकाष्ठा हे शब्द एकाच पानांत योग्य ठिकाणीं बसलेलें त्यांना मी दाखवून देण्यास तयार आहें. इतकेंच काय पण त्यांतल्या त्यांत समर्पकपणें त्यांस भिन्न संदर्भहि लाभल्याचें दिसेल. 'यत्नांची पराकाष्ठा' म्हटलेलें दिसेल तर 'मूर्खपणाची कमाल' म्हटलेलें दिसेल. आणि ज्यांच्या ग्रंथांतील उताऱ्यास अधिक शुद्ध व सुंदर करण्याचा रा. पटवर्धन यांनीं प्रयत्न केला आहे त्या केळकरांच्या ग्रंथांतूनच पुराव्यादाखल उतारे देण्याची माझी तयारी आहे. तरीहि सावरकर—पटवर्धनांखेरीज इतर लेखकांस फक्त फारशीच शब्द आठवतात आणि त्यामुळें मराठी शब्द मेले असें पटवर्धन म्हणत राहाणार असतील तर प्रस्तुत वादांतून त्यांच्या हेकेखोरपणाव्यतिरिक्त कांहींच निष्पन्न होण्याची आशा नाहीं !

सावरकर—पटवर्धनांची चळवळ भाषा शुद्ध करण्याची नसून एका दृष्टीनें

पाहतां गाय मारल्याबद्दल वासरूं मारण्याची आहे, तर दुसऱ्यादृष्टीनें पाहतां अितर प्रांत आणि अितर देश यांच्या अंध अनुकरणाची आहे. तसें नसतें तर शब्दांपेक्षा प्रयोगांच्या (Idiom Costructions) शुद्धतेकडे त्यांनीं अधिक लक्ष दिलें असतें, तसेंच माझ्या आणखी अेका महत्त्वाच्या मुद्दयास त्यांनीं नुसता स्पर्शहि केला नाहीं आणि त्यांच्या दाखवून दिलेल्या अिंग्रजी वळणाच्या प्रयोगाबाबत त्यांनीं सोअिस्कर मौन स्वीकारून त्याचा भाषाशुद्धीशीं संबंध नाहीं असेंहि विलक्षण विधान केलें आहे आणि अितके असून त्यांस विरोध करणारे भाषेसंबंधीं सूक्ष्म विचार करीत नाहींत असें म्हणण्याचें ते धाष्टर्य करीत आहेतच. " मी व्यायाम घेतला, " " मी आंघोळ घेतली " या विषयाला न्याय करण्यास अेवढा वेळ पुरणार नाहीं " हें मिशनरी शब्द मात्र अशुद्ध वाटतात !

याच अज्ञानमूलक विचारसरणीवर विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं स्पष्ट शब्दांत हल्ला चढवून " शब्दबहिष्कार म्हणजे भाषाशुद्धि नव्हे...प्रयोग आणि वाक्प्रचार शुद्ध राखा " असें बजावलें होतें व त्याचा स्पष्ट आधारहि मीं माझ्या मागील लेखांत अुतरला आहे. तरी रा. सावरकर हे चिपळुणकरांनीं आमचीच भाषाशुद्धीची चळवळ केली होती असें निराधार व धाष्टर्याचें विधान फिरून करीत राहिलेच आहे ! सावरकर यांस माझा लेख व त्यांतील चिपळुणकरांचा अुतारा फिरून पाहण्यास सांगण्यांत अर्थ नाहीं, तरी पण प्रांजल वाचकांनीं तो स्वसमाधानार्थ वाचल्यास उपयोग होअील.

यापुढें प्रश्न अिंग्रजी शब्द आणि अिंग्रजीमय वातावरण यांचा. " दुकानांच्या पाटया अिंग्रजी " " बायकामुलांत अिंग्रजी " .........हें सर्व अिष्ट आहे असें म्हणणारा पक्ष अस्तित्वांत नाहीं; निदान महाराष्ट्रांत तरी नाहीं. पण या अिंग्रजीमय स्थितीचें खरें कारण न शोधतां आपल्याहूनहि स्वसंस्कृतीचे अभिमानी असणाऱ्या लोकमान्य लेखकांची " परधार्जिणी वृत्ति " हेंच या स्थितीचें कारण असें म्हणण्याचें निंद्य धाष्टर्य पटवर्धन-सावरकर अद्यापहि करीत आहेत ही दुःखाची गोष्ट होय. सावरकर-पटवर्धनांव्यतिरिक्त लेखक अिंग्रजी शब्दांनीं हुरळणारे असते तर त्यांनीं ' मिशन' ' अॅपील, ' ' रोमॅंटिक स्कूल ' वगैरे भाषांतरास कठीण पण अर्थपूर्ण

अशा शब्दाचा स्वीकार मागेंच केला असता. किंवा "अपराधार्जिण्या" (?) रा. पटवर्धनांप्रमाणें रोमँटिक हा धडधडीत इंग्रजी शब्द प्रौढ संस्कृतप्रचुर काव्यपंक्तींत बसविला असता ! पण तसें आजचे लेखक करीत नाहींत. त्यांचें मत त्याविरुद्ध आहे. त्यांस शुद्ध भाषा कोणती हें कळतें. पण हेअरकटिंगसलूनवाल्या अश नापीत बंधूंस अपटुडेट पोषाख केलेले आपले साहेबी भाषाबांधव पाहून आपल्या दुकानास मराठी नांव देऊन चालणार नाहीं असें वाटल्यास आश्चर्य काय अथवा दे. भ. सावरकरांचे संस्कृतिविध्वंसक लेख वाचून दुसऱ्या अखाद्या देशभक्तास देवनागरी अैवजीं रोमनलिपी स्वीकारून राष्ट्रैक्य करा ससें म्हणण्यास अुमेद आल्यास आश्चर्य कसचें ? सारांश संस्कृतीच्या अितर बाबतींत साहेबी किता, जुन्या संस्कृतींतील हरेक संस्कारांची टवाळी, अहोरात्र शाळा कॉलेजांतून अिंग्रजी पठण हें सभोंवार चालू असतां अिंग्रजी घरांत घेतल्याचा आरोप लेखकांच्याच माथीं कसा येतो ? ज्यांनीं परकीय संस्कृतीचे गोडवे गद्यांतच नव्हे तर पद्यांतहि गाअिले, जे स्वकीय धर्मसंस्थांची व पूर्वजांची टवाळी मासिकांतून सतत करीत आहेत आणि जे आपले मिशनरी प्रयोग शुद्धीच्या नांवाखालीं घरांत आणीत आहेत त्यांस शब्दसंग्रहांत मात्र परधार्जिणेपणा दिसावा हे अेक अजब कूट आम्ही प्रो. फ्रॉइड्सारख्या मनोविकृतिचिकित्सकांस पृथक्करणार्थ बहाल करतों ! **घरीं दारीं अिंग्रजी नको असेल तर अिंग्रजी विद्येला तरुण पिढीच्या शिक्षणक्रमांत वेदतुल्य स्थान देण्याचें बंद करा.** स्वकीय शब्दसंग्रह, हा जप सोडून स्वकीय संस्कृति, स्वकीय संस्था; हा जप सुरू करा. नेक्टाय् गळ्यांत घालूं लागल्यानंतर 'गळपट्टी' शब्द न वावरणारांच्या परधार्जिणेपणावर व्याख्यान देणें हें फारसें शोभिवंत तर नाहींच पण प्रचारदृष्ट्या अुपयुक्तहि नाहीं ! आमच्या कॉलेजांत ऋक्संहितेचें आणि अुत्तररामचरित्रांचें अध्ययनहि अिंग्रजींतून चालत असतां आमचे पटवर्धन त्याच कॉलेजांतील विद्यार्थ्यांस घरीं येतांच "मला प्रोफेसर म्हणूं नको, 'प्राध्यापक' म्हण" असें म्हणणार ! **आपल्या लेखक बांधवांस बहिष्काराची धाबळी नेसावयास सांगून ही अिंग्रजी शब्दांची गटारगंगा थांबणार नाहीं.** तुमच्या मतांत

प्रामाणिकपणा असेल, तुमचा आवेश प्रहसनवजा नसेल तर जन्मभाषा व पितृ भाषा या दोहोंसहि पदच्युत करणारी व आमचा जन्माच्या जन्म खाणारी अिंग्रजी भाषा केवळ परदेशव्यवहाराची भाषा या दुय्यम पदावर आणण्याची चळवळ हातीं घ्या. आणि त्यास जे विरोध करतील त्यांस परधार्जिणे म्हणा, पण जे अिंग्रजी 'ईडियम' देखील मराठींत जशीच्या तशी वळावी म्हणणार आणि पाश्चात्य संस्कृति म्हणजे वेदतुल्य मानणार त्या शुद्धीवाल्यास अिंग्रजीचें हें सशास्त्र अुचाटण कितपत रुचेल याची आम्हांस मोठीच शंका आहे. प्रचलित शिक्षणक्रमांतील अिंग्रजीच्या अवास्तव स्तोमाविरुद्ध सावरकर–पटवर्धन ब्रहि काढीत नाहींत, यावरून वरील शंकेस बळकटीच येते ! भारतीय संस्कृतीशीं सावरकर–पटवर्धनांचा संबंध तिच्या अनेक पवित्र शाखा–पल्लवांवर वीरश्रीनें घाव घालण्याहून अधिक असल्याचें अैकिवांत नाहीं. आणि शेवटीं दुःखाची गोष्ट म्हणजे त्यांचा अेककल्ली, शब्दवेडा, स्वभाषाभिमान देखील संस्कृतिप्रेमाअितकाच खोटा आहे! कारण परकीय शब्दांवर बहिष्कार घालावयास सजलेले हे शुद्धिवादी त्याबरोबरच अनेक जातिवंत चिरपरिचित शब्द मारण्याचीहि चळवळ गुप्तपणें करीत आहेत. पण अिकडे त्यांच्या स्वाभिमानाच्या गोंगाटांत कोणाचेंच लक्ष जात नाहीं ! मीं माझ्या लेखांत तें सप्रमाण सिद्ध केलें असून त्या महान् आरोपाबद्दल या दोघांनीं अर्थात् अेक अक्षरहि काढलें नाहीं. 'मेहेरबानी' शब्दानें 'कृपा' शब्द कितपत मारला हें आपण पाहिलेंच आहे. पण 'आंदोलन' हा सर्वस्वी अज्ञानमूलक शब्द चळवळ या अर्थी वापरून 'चळवळ' या समर्थांच्या कालापासून आलेल्या शुद्ध मराठी शब्दास कोण मारीत आहे ? 'मथळा' मारून 'शीर्षक' शब्द वापरण्यानें क्लिष्टतेखेरीज कोणतें व्रत साधत आहे ! 'नमस्कार' शब्द अव्हेरून 'नमस्ते' (= अरे तुला नमस्कार !) हा ग्राम्यप्रयोग कोण रूढ करीत आहे ? Appropriate Word ! या अर्थी 'समर्पक शब्द' हा रूढ शब्द प्रयोग आर्जवून टाळून त्या जागीं "समुचित शब्द" असें कोण म्हणत आहे ? शद्वनिर्मिति केवळ परकीय शद्बच मारण्याकरितां चालला नसून स्वकीय शद्ब मारण्याचेंहि कार्य ती दुष्ट दक्षतेनें करीत आहे, हें सावरकर–पटवर्धनांस "स्वाभिमानाबद्दल" सर्टिफिकिटें

देण्याची धाशी करणाऱ्यांच्या दिलदार डोळ्यांस अद्यापि दिसलें नाहीं काय? समानार्थी मराठी शब्दांशेजारीं गरीबपणें आणि सेवक वृत्तीनें नांदणाऱ्या फारशी शब्दांच्या यादीहून स्वभाषेच्या सुबोधतेच्या मुळावर जन्मलेल्या या सावरकरी शब्दांची यादी खास लहान नाहीं. शुद्धिवाल्यांच्या घेडगुजरी प्रयोगाप्रमाणेंच या गोताला काळ झालेल्या शब्दांची यादी पुरविण्यास माझी तयारी आहे.

सारांश, ज्यांस स्वसंस्कृतीविषयीं तिरस्कार आहे, ज्यांस परकीय शब्दांची टोळधाड सोडणारे सार्वत्रिक व बेसुमार इंग्रजी शिक्षण हें भाषेवर संकट वाटत नाहीं, जे लहरीखातर नवे शब्द बनवून शुद्ध मराठी शब्दांची गळचेपी करीत आहेत, त्यांच्या बहिष्कारप्रधान भाषाशुद्धीच्या बुडाशीं स्वभाषाप्रेम नसून तऱ्हेवाईकपणा आणि निष्फळ सूडबुद्धि आहे असें म्हणण्यावांचून दुसरें कोणतें निदान ठरवितां येईल? आणि परकीयांच्या अनेकविध सांस्कृतिक वर्चस्वाचे गोडवे गाऊन स्वकीयांस तें स्वीकारा म्हणणारांनीं शब्दकोशापुरताच प्रतिकाराचा आव आणावा हें तरी हास्यस्पदच नव्हे काय?

सारांश, सावरकर–पटवर्धनांच्या तऱ्हेवाईक शब्दसंग्रहात्मक चळवळीनें तिला चिटकविण्यांत आलेल्या स्वभाषाभिमानाच्या पार्श्वभूमीमुळें किंचित्काल फसणारांनीं पुढील गोष्टी लक्षांत ठेवाव्याः—(१) भाषा हें संस्कृतीचें एक अंग असल्यामुळें स्वसंस्कृति व स्वकीय संस्था यांवर हल्ला चढविणारांचा भाषाभिमान शंकास्पद म्हटला पाहिजे; (२) बेसुमार इंग्रजी अध्ययनामुळें सध्या व्यवहारांत (लेखनांत नव्हे) इंग्रजी शिरलेलें दिसतें; तरी या मूळ कारणाविषयीं अवाक्षरहि न काढणारांची दृष्टि व चळवळ विकृत म्हटली पाहिजे; (३) फारशी शब्दांनीं मराठी शब्द नष्ट केले आहेत हें जोंपर्यंत सावरकर–पटवर्धनास सिद्ध करतां येंत नाही तोंपर्यंत त्यांच्या भ्रांतिमूलक ओरडयाने चिंताग्रस्त होण्याचें कारण नाही; (४) व मराठी शब्दांचा नाश होत आहे असें त्यांनी सिद्ध केले तरीहि ते आपला तऱ्हेवाईक शब्दसंग्रह रूढ करण्याच्या लहरीमुळे सुंदर चिरपरिचित जातिवंत मराठी शब्द मारीत आहेत, या गोष्टीचाहि त्यांस जाब विचारलाच पाहिजे; (५) सावरकर–पटवर्धन यांस स्वभाषेंतील शब्दसंग्रहाहून इतर कशाचेंच रक्षणहि अवश्य वाटत नाहीं, आणि शब्दसंग्रहाचें

रक्षणहि त्यांच्या चळवळीनें होत नाहीं; अतएव स्वसंस्कृतीचा द्वेष करणाऱ्या व केवळ शब्दसंग्रहाबद्दलच जिव्हाळा दाखविणाऱ्या या दोघां भाषाशुद्धिवाद्यांच्या चळवळीस तऱ्हेवाईकपणा व हेकेखोरपणा यांखेरीज कशाचाच पाया नाहीं.

माझ्या आणि सावरकर–पटवर्धनांच्या मूळ भूमिकेबद्दल एवढें पुरें आहे. या वादांतून निघालेल्या भाषाशास्त्रविषयक व इतिहासविषयक प्रश्नांचा खल मीं माझ्या पहिल्या लेखांत केला तसाच आणखी थोडा सविस्तर सवडी-नुसार अन्यत्र करणार आहें.

संपूर्ण

# परिशिष्ट

## चिपळूणकर–लोकहितवादी–वादावरील
## डॉ० केतकर यांचें मत

[ इतर अनेक आरोपांबरोबर संस्कृतचा गंथ नसल्याचाही आरोप विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं लोकहितवादी यांचेवर केलेला आहे. प्रस्तुत आरोपाचें खंडन मीं माझ्या निबंधांत केलेंच आहे. तरी प्रस्तुत मुद्यासंबंधीं मी डॉ० केतकर यास लिहून त्यांचें मत मागविलें होतें. **त्यांच्या अप्रकाशित पत्रांतील.उतारा** पुढें दिला आहे. ]

"लोकहितवादी संस्कृतविद्येस पूर्ण पारखे नसावेत असें वाटतें कारण त्या वेळेस अनेक संस्कृत ग्रंथांचीं भाषांतरें इंग्रजींतहि झालीं नव्हतीं. त्यांचें संस्कृत पांडित्य कितपत होतें हें सांगतां येत नाहीं. पांडित्य या दृष्टीनें विष्णुशास्त्र्यांसही त्या कोटींत घालतां येत नाहीं असें पांगारकरांनीं निबंधमालेच्या एकंदर कार्यावर विचार करतांना आणि त्यांतल्या त्यांत विद्वत्त्व आणि कवित्त्व या निबंधावर विचार करतांना म्हटलें आहे. विष्णुशास्त्री अल्पवयांत वारले. त्यामुळें खुद्द त्यांनाहि संस्कृत विद्या फारशी अवगत नव्हती व त्यामुळें इतरांची संस्कृतविद्या अजमावण्याइतका त्यांचाच विकास झाला नव्हता. लोकहितवादी व विष्णुशास्त्री यांचें अभ्यास–क्षेत्र निराळें होतें; त्यामुळें लोकहितवादीच्या अल्पवयी प्रतिस्पर्ध्यास लोकहितवादींना संस्कृत पांडित्य नसावें अशी कल्पना झाली असणें शक्य आहे. **विद्वान या दृष्टीनें लोकहितवादीस जें महत्त्व देतां येईल तें विष्णुशास्त्र्यांस नाहीं.** शास्त्रीबोवांचें महत्त्व " नव्या प्रकारच्या भावनेचा प्रचारक " आणि अर्वाचीन पुण्याच्या निर्माणकर्ता या दृष्टीनें आहे. कळावें हे वि.

**श्री. व्यं."**

१४–३–३२

# कांही मुद्रणदोष



[ अर्थबोध होण्यास अडचण पडेल अशा कांहीं मुद्रणदोषांचें शुद्धिपत्र पुढें दिलें आहे. ]

| पान—ओळ | बद्दल | वाचावें |
|---|---|---|
| ७ ( ओळ ४ ) | मर्यादादेत | मर्यादेंत |
| १८ ( ओळ १२ ) | नैय्याइक | नैय्यायिक |
| ८७ ( ओळ ६ ) | प्रेताखातर | प्रेमाखातर |
| ९० ( ओळ ६ ) | स्वागतभाषण | स्वगतभाषण |
| ९२ ( ओळ ७ ) | अधिक उणीव | अधिक जाणीव |
| ९६ ( ओळ ११ ) | प्रयोगोप्रयोगी | प्रयोगोपयोगी |



## — माझें प्रकाशन —

१ वळवांचे पाऊस ( कथासंग्रह ) किं. १। रुपया.
*२ पुनर्भेट भाग २ रा ( कथासंग्रह ) किंमत १ रुपया
*३ पुनर्भेट भाग ३ रा ( कथासंग्रह ) किंमत १। रु.
४ कणसाचे दाणे ( कथासंग्रह ) किंमत १ रुपया.
*५ दुर्दैवी मोहरे ( ऐतिहासिक चरित्रें ) किंमत १ रुपया.
६ पैसाच पैसा ( सचित्र नाटक ) किंमत १ रुपया.
७ जिवन-पथ ( कथासंग्रह ) किंमत १ रुपया.
८ आवडत्या गोष्टी ( ६१ लेखकांचा कथासंग्रह ) किंमत ३ रुपये.
*९ चित्तरंजन किंमत १। रुपया.
१० फुलबाग ( कविता ) किंमत १ रुपया.
११ वायफळांचा मळा किंमत २॥ रुपये.
१२ वाहते वारे ( कथासंग्रह ) किंमत १२ आणे.
१३ गारांचा वर्षाव ( कथासंग्रह ) किंमत १। रुपया.
१४ सोनेरी नागीण ( कादंबरी ) किंमत १ रुपया.
१५ हायस्कूल विद्यार्थी ( कादंबरी ) किंमत ८ आणे.
१६ शि. म. परांजपे चरित्र व आठवणी किंमत १ रुपया.
१७ संराक ( विडंबनात्मक कवितांचा संग्रह ) किंमत १ रुपया.
१८ खेड्यांतील स्वभावचित्रें ( ले. मो. गो. सोमण, बी. ए. ) किंमत १। रुपया.
१९ गुलाबाच्या पाकळ्या ( ले. . र. कवठेकर ) किंमत १। रुपया.
२० रेशमी चिमटे ( ले. वा. वि. जोशी ) किंमत १। रुपया.
२१ बोलका सिनेमा ( ले. य. गो. जोशी ) किंमत ८ आणे.
२२ होमकुंड ( ले. य. गो. जोशी ) किंमत २ रुपये.
२३ रशियांतील राज्यक्रान्ती ( पां. वा. गाडगीळ ) किंमत २ रुपये.

शिवाय सर्व तऱ्हेचीं पुस्तकें ऑर्डरप्रमाणें पाठविलीं जातील.

प्रकाशक—यशवंत गोपाळ जोशी, ७२३ सदाशिव, पुणें २.

*मुंबई इलाखा शाळाखात्यांत लायब्ररींकरितां व बक्षिसाकरितां मंजूर